# सुलभ श्रीमद्भागवत

## भाग ३ रा

सुलभ श्रीमद्भागवत भाग १ ते ६ या ग्रंथास
महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचेकडून
अनुदान मिळाले आहे.
सदर ग्रंथाची किंमत त्यानीच ठेविलेली आहे.

**स्कंध ७, ८ व ९**

सन १९६५

किंमत ७ रुपये

# सप्तमस्कंधाची अनुक्रमणिका

| अध्याय | विषय | पृष्ठें |
|---|---|---|

**सप्तमस्कंधानुक्रमणिका समाप्त**

# अष्टमस्कंधाची अनुक्रमणिका

**अष्टमस्कंधानुक्रमणिका समाप्त**

# नवमस्कंधाची अनुक्रमणिका

## परिशिष्टें



**नवमस्कंधाची अनुक्रमणिका समाप्त**

॥ श्रीः ॥

# सुलभ श्रीमद्भागवत

## सप्तम स्कंध

## अध्याय १ ला

परीक्षित् म्हणाला,–हे शुकमुने, सर्व भूतांचें हित करणारा, त्यांना आवडणारा व त्यांच्या ठिकाणीं समदृष्टि ठेवणारा असा जो भगवान् त्यानें इंद्राच्या पक्षपातानें केवळ शत्रूप्रमाणें दै ा चा वध स्वतः कसा केला बरें ? ॥ १ ॥ कारण, साक्षात् परमानंदस्वरूपी असा निर्गुण विष्णूला देवांपासून कांहीं कार्यभाग करून घ्यावयाचा नसल्यामुळें देवांवर त्याची प्रीति संभवत नाहीं व असुरांपासून त्याला भीति नसल्यामुळें त्यांच्याशीं त्याचा द्वेष असण्याचाहि संभव नाहीं ॥ २ ॥ असें असल्यामुळें श्रीनारायणाच्या गुणांविषयीं आम्हांला मोठा संशय उत्पन्न झाला आहे. हे महाभाग्यशाली, तो तूं दूर कर ! ॥ ३ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे परीक्षित्राजा, ज्यामध्यें अतिशय पुण्यकारक आणि ईश्वरभक्तीची वृद्धि करणारें असें भगवद्भक्त प्रल्हादाचें महात्म्य नारदादि ऋषींनीं गायन केलें आहे, त्या अद्भुत हरिचरित्राविषयीं तूं फार उत्तम प्रश्न केलास. व्यासमुनीला नमस्कार करून ती हरिकथा मी कथन करतों ॥ ४ ॥ ५ ॥ हे राजा, भगवान् मायातीत निर्गुण, जन्मादिविकारशून्य व देहेंन्द्रियादिरहित असा असतांहि आपल्या मायेच्या सत्त्वादि गुणांमध्यें प्रवेश करून शिक्षेस पात्र असलेल्या दुष्टांना शिक्षा करणारा होतो ॥ ६ ॥ हे राजा, सत्त्व, रज व तम हे गुण प्रकृतीचेच आहेत; परमात्म्याचे मुळींच नाहींत. कारण सत्त्वादि गुणांचा ऱ्हास किंवा वृद्धि हीं एकदम घडत नाहींत ॥ ७ ॥ सत्त्वगुणाच्या जय-काळीं परमात्मा त्या काळाला अनुकूल होऊन देव आणि ऋषि यांच्या देहांमध्यें प्रविष्ट होतो व त्यांची वृद्धि करतो; तसाच रजोगुणाच्या जयकाळीं तो असुरांच्या देहांमध्यें प्रविष्ट होऊन त्यांची वृद्धि करतो आणि तमोगुणाच्या जयकाळीं यक्ष व राक्षस यांच्य देहांमध्ये प्रविष्ट होऊन त्यांचा उत्कर्ष करतो ॥ ८ ॥ जसे अग्नि, उदक, आकाश इत्यादि पदार्थ काष्ठ, जलपात्र, घट इत्यादिकांच्या ठिकाणीं त्यांच्यात्यांच्यासारख्या अनेकअनेक रूपांनीं भासतात, त्याचप्रमाणें भगवानहि देवादिकांच्या ठिकाणीं भासमान होतो; परंतु जसे अग्नि वगैरे काष्ठादिकांच्या ठिकाणीं भिन्नत्वानें अनुभवास येतात, तसा मात्र तो अनुभवास येत नाहीं.

तथापि ज्ञानी पुरुष विचार करून त्या परमात्म्याचें ज्ञान करून घेतात ।। ९ ।। जेव्हां जीवाच्या भोगाकरितां परमेश्वराला शरीरें उत्पन्न करण्याची इच्छा होते, तेव्हां तो साम्यावस्थेमध्यें असलेल्या रजोगुणाला आपल्या मायेच्या योगानें निराळा करून त्याची वृद्धि करतो. तशीच जेव्हां त्याला चित्रविचित्र शरीरांमध्ये क्रीडा करण्याची इच्छा होते, तेव्हां सत्त्वगुणाला निराळा करून तो त्याची वृद्धि करतो. आणि निद्रा घेण्याची त्याला जेव्हां जेव्हां इच्छा होते, तेव्हां तो विश्वाचा संहार करण्याकरितां तमोगुणाला पृथक् करून त्याची वृद्धि करतो ।। १० ।। हे राजा, निमित्तभूत असलेल्या प्रकृतिपुरुषांच्या योगानें सृष्ट्यादि सर्व व्यापार करणारा हा ईश्वर, प्रकृतिपुरुषांना साहाय्य करणारा असल्यामुळें त्याच्या आश्रयभूत अशा काळाला आपण स्वतःच उत्पन्न करतो. हे राजा, हा जो काळ आहे तो सत्त्वगुणाची वृद्धि करतो म्हणून त्याचा नियंता हा महाकीर्तिमान् देवप्रिय ईश्वरहि सत्त्वगुणप्रधान अशा देवसमुदायाची वृद्धि करतो आणि रजोगुण व तमोगुण ज्यांत प्रधान आहेत अशा देवांचे शत्रु जे असुर यांचा वध करतो ।। ११ ।। हे राजा, ' ईश्वर द्वेषादिशून्य असतां त्यानें दैत्यांचा वध केला ' ह्याविषयीं राजसूयनामक महायज्ञाच्या प्रसंगीं पूर्वी युधिष्ठिरानें प्रश्न केला असतां, देवर्षि नारदानें प्रीतीनें त्याला इतिहास सांगितला होता ।।१२।। त्या राजसूयनामक महायज्ञामध्यें भगवान वासुदेवाच्या ठिकाणीं शिशुपाळाला प्राप्त झालेलें सायुज्य अवलोकन करून, पांडुपुत्र धर्मराजाच्या मनाला आश्चर्य वाटलें व सर्व मुनि ऐकत असतां त्या यज्ञप्रसंगीं धर्मराजानें तेथे बसलेल्या देवर्षि नारदमुनीला प्रश्न केला ।। १३ ।। १४ ।।

युधिष्ठिर म्हणाला,—हे नारदमुने, हा शिशुपाळ श्रीकृष्णाचा नित्य द्वेष करीत असून त्याला मायातीत अशा वासुदेवरूप तत्त्वामध्यें एकनिष्ठ भक्तांनाहि दुर्लभ अशी सायुज्य-मुक्ति प्राप्त व्हावी, हें मोठें आश्चर्य होय ! ।। १५ ।। हे मुने, आम्हां सर्वांनाच हा प्रकार काय आहे हें जाणण्याची इच्छा आहे. कारण, भगवन्निंदेमुळें वेनराजाला ब्राह्मणांनीं नरकांत पाडलें होतें ।। १६ ।। हा दमघोषाचा पुत्र पापी शिशुपाळ, तसाच त्याचा कनिष्ठ बंधु दुर्बुद्धि दंतवक्त्र हे दोघेहि अगदीं बोबडे शब्द उच्चारूं लागल्यापासून तों आतां-पर्यंत भगवान् गोविंदाशीं मत्सर बुद्धीनें वागत आहेत ।। १७ ।। अक्षय अशा परब्रह्मस्वरूप श्रीविष्णूला वारंवार शिव्या देणाऱ्या ह्यांच्या जिव्हेवर कुष्ठ न उठतां व ते स्वतः घोर नरकामध्यें न पडतां उलट त्या दुर्लभस्वरूप भगवंताच्या ठिकाणीं सर्व लोकांसमक्ष अना-यासानें यांचा लय झाला ! हें अवलोकन करून वायूनें भ्रमण पावणाऱ्या दीपज्वाळे-प्रमाणें माझी बुद्धि भ्रमण करीत आहे. मला हें अत्यंत आश्चर्य वाटतें ! यास्तव ह्या प्रकाराचें कारण काय, तें तूं मला सांग ! तूं सर्वज्ञ आहेस ! ।।१८।। १९ ।। २० ।।

शुकाचार्य म्हणाले,—हे परीक्षित्‌राजा, धर्मराजाचें तें भाषण श्रवण करून भगवान् नारदऋषि संतुष्ट झाला, आणि सर्व सभा श्रवण करीत असतां त्या धर्मराजाला सावध करून तो ती कथा सांगूं लागला ।। २१ ।।

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, निंदा स्तुति, सत्कार आणि तिरस्कार ह्यांचें ज्ञान होण्याकरितां प्रकृतिपुरुषांचा भेद न मानतां शरिराची रचना झाली आहे ॥ २२ ॥ हे धर्मराजा, त्या देहादिकांच्या अभिमानानें प्राण्याला त्याविषयीं वैषम्य उत्पन्न होतें आणि त्या वैषम्यानें ताडण व निंदा हीं होतात. देहाविषयींचा अभिमान अविद्द झालेला असल्यामुळें त्या देहाचा वध झाला म्हणजे प्राण्यांना वध केल्याचें पाप लागतें तसें ईश्वरास लागत नाहीं. कारण तो सर्वांचा अद्वितीय आत्मा असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं प्राण्यांसारखा अभिमान नाहीं. तो परमात्मा दैत्यांच्या हिताकरितांच त्यांना दंड करीत असतो. तेव्हां त्याला हिंसादोष तरी कशानें लागणार ? ॥ २३ ॥ ॥ २४ ॥ हे धर्मराजा, ह्याकरितां वैरानुबन्ध, निर्वैर भक्तियोग, भय, स्नेह अथवा काम ह्यांपैकीं कोणत्याहि उपायानें ईश्वराच्या ठिकाणीं मन लावावें. कारण तसें मन लागलें असतां पुरुषाला ईश्वरव्यतिरिक्त वस्तु अगदीं दिसेनाशी होत्ये ॥ २५ ॥ हे राजा, नित्य वैराच्या योगें जसा मनुष्य तन्मय होऊन जातो, तसा भक्तियोगानें होत नाहीं, असें माझें ठाम मत झालें आहे ॥ २६॥ उदाहरण, कुंभारीण ' नांवाच्या भ्रमरानें भिंतीवर घर बांधून त्यांत ठेवलेला कीटक त्या भ्रमरविषयाचा द्वेष व भय यांच्या योगानें निरंतर त्याचें स्मरण करीत असल्यामुळें त्याला शेवटीं भ्रमराचें स्वरूप प्राप्त होतें. त्याप्रमाणें मायेनें मनुष्यरूप धारण करणाऱ्या भगवान् सदानंदरूप ईश्वराच्या ठिकाणीं वैरभाव धारण करून त्याचें वारंवार चिंतन करणारे कित्येक प्राणी निष्पाप होऊन ईश्वरस्वरूपास प्राप्त झाले आहेत ॥ २७ ॥ ॥ २८ ॥ हे राजा, काम, द्वेष, भय, स्नेह अथवा भक्ति ह्या साधनांनीं ईश्वराच्या ठिकाणीं मन लावून व त्या कामादिनिमित्तक पातकांचें निरसन करून पुष्कळ लोक त्यांच्या सायुज्यगतीला प्राप्त झाले आहेत ॥ २९ ॥ कामाच्या योगानें गोपी, भयामुळें कंस, द्वेषानें शिशुपाळप्रभृति राजे, संबंधानें यादव, स्नेहामुळें तुम्ही पांडव आणि हे धर्मराजा, भक्तीनें आम्ही, त्याच्या स्वरूपाला प्राप्त झालों आहों ॥ ३० ॥ पण हे राजा, भयादिकांनीं श्रीहरीचें चिंतन करणाऱ्या या पांचापैकीं वेनराजा कोणीच नव्हता. असो. तात्पर्य, कोणत्या तरी उपायानें श्रीकृष्णाच्या ठिकाणीं मन लावावें ॥ ३१ ॥ हे पांडुपुत्रा, शिशुपाळ आणि दंतवक्त्र हे जे तुम्हां पांडवांचे मावसभाऊ ते विष्णूच्या पार्षदगणांपैकीं मुख्य असून ब्राह्मणांच्या शापामुळें वैकुंठस्थानापासून च्युत झाले होते ॥ ३२ ॥

युधिष्ठिर म्हणाला,—हे मुने, हरीच्या भक्तांवरहि संकटें आणणारा असा तो शाप कोणत्या प्रकारचा होता व तो कोणीं दिला ? हा शाप मला तर अविश्वसनीय वाटतो. कारण, श्रीहरीच्या एकनिष्ठ भक्तांना जन्म प्राप्त होणें हें असंभवनीय आहे ॥ ३३ ॥ जन्माला कारणीभूत असे देह, इंद्रियें व प्राण हे वैकुंठवासी पुरुषांना मुळींच नसतात. तेव्हां त्यांना देहाचा संबंध घडल्याचा हा वृत्तांत तुम्ही आम्हांला कथन करा ! ॥ ३४ ॥

नारद म्हणाला,—हे युधिष्ठिरा, एका वेळीं सनत्कुमार, सनक, सनंदन आणि सनातन हे ब्रह्मदेवाचे चार पुत्र त्रैलोक्यामध्यें संचार करीत करीत भगवदिच्छेनें वैकुण्ठास

गेले ॥ ३५ ॥ मरीचिप्रभृति प्रजापतींच्याहि आधीं उत्पन्न झालेले ते मुनि, पांचसहा वर्षांच्या मुलांसारखे दिसत असून नग्न होते. म्हणून दोघा द्वारपाळांनीं त्यांस मुलें समजून आंत जाण्याविषयीं प्रतिबंध केला ॥ ३६ ॥ तेव्हां ते क्रुद्ध झाले व त्यांनीं द्वारपाळांस शाप दिला कीं, तुम्ही रजोगुण आणि तमोगुण यांनीं रहित अशा मधुसूदनाच्या चरणांपाशीं नुसते राहाण्यासहि योग्य नाहीं, ह्याकरितां हे मूढ हो, अत्यंत पापी अशा असुरयोनींत सत्वर जा ! ॥ ३७ ॥ त्यांना असा शाप देतांच ते स्वस्थानापासून भ्रष्ट होऊं लागले. तेव्हां त्या दयाळू मुनींनीं पुनः त्यांना सांगितलें कीं, तुमचे तीन जन्म झाले म्हणजे हा शाप समाप्त होऊन तुम्हांला पुनः स्वस्थानाची प्राप्ति होईल ! ॥ ३८ ॥ नंतर ते दोघे द्वारपाळ, दैत्य आणि दानव ह्यांना पूज्य असे दितीचे पुत्र झाले. त्यांत हिरण्यकशिपु हा ज्येष्ठ असून हिरण्याक्ष हा त्यापेक्षां लहान होता ॥ ३९ ॥ श्रीहरीनें नारसिंहावतार घेऊन हिरण्यकशिपूचा वध केला आणि पृथ्वीचा उद्धार करण्याकरितां वरहावतार घेणाऱ्या त्याच श्रीहरीनें हिरण्याचाहि वध केला ॥ ४० ॥ हिरण्यकशिपूनें श्रीहरीची आवडीनें भक्ति करणाऱ्या अशा आपल्या प्रल्हादनामक पुत्राचा वध करण्याची इच्छा धरून त्याला मृत्यु प्राप्त होण्याकरितां नाना प्रकारच्या यातना दिल्या ॥ ४१ ॥ परंतु सर्वत्र सबाह्याभ्यन्तरीं व्यापक ब्रह्मच आहे असें पाहणारा प्रल्हाद, सर्व भूतांचा आत्माच व द्वेषादिशून्य आणि ईश्वराच्या तेजानें व्याप्त असल्यामुळें त्या अनेक उपायांनीं त्याचा वध करण्यास हिरण्यकशिपु समर्थ झाला नाहीं ॥ ४२ ॥ नंतर दुसऱ्या जन्मीं ते उभयतां विश्रवानामक ऋषीच्या केशिनीनामक स्त्रीच्या पोटीं जन्मास आले व रावण आणि कुंभकर्ण या नांवांनीं प्रसिद्ध होऊन सर्व लोकांना पीडा देते झाले ॥ ४३ ॥ तेव्हांहि भगवंतानें ब्राह्मणशापासून त्यांना मुक्त करण्याकरितां रघुवंशामध्यें रामावतार धारण करून त्यांचा वध केला. हे धर्मराजा, त्या भगवान् रामाचा पराक्रम मार्कण्डेयऋषीच्या तोंडून तुला ऐकावयास मिळेल ! ॥ ४४ ॥ असो. पुढें तेच रावणकुंभकर्ण तिसऱ्या जन्मीं क्षत्रिय होऊन तुझे मावसबंधु शिशुपाळ आणि दन्तवक्त्र झाले आणि श्रीकृष्णाच्या सुदर्शनचक्रानें निष्पाप होऊन ते नुकतेच ब्रह्मशापापासून मुक्त झाले ! ॥ ४५ ॥ ह्याप्रमाणें विष्णुपार्षद नित्यवैरामुळें घडलेल्या तीव्र ध्यानानें अच्युतस्वरूपी होऊन पुनरपि श्रीहरीजवळ गेले. ॥ ४६ ॥

युधिष्ठिर म्हणाले,—हे नारदमुने, माहात्म्या अशा आपल्या प्रिय पुत्राविषयीं हिरण्यकशिपूचा इतका द्वेष होण्यास व त्या प्रल्हादाचें अच्युताच्या ठिकाणीं एकचित्त होण्यास कारण काय झालें ? तें तूं मला सांग ! ॥ ४७ ॥

**पहिला अध्याय समाप्त**

# अध्याय २ रा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, ह्याप्रमाणें वराहरूप धारण करणाऱ्या श्रीहरीनें भ्रात्या हिरण्याक्षाचा वध केला असतां रोषानें व शोकानें हिरण्यकशिपु अगदीं संतप्त झाला ॥ १ ॥ क्रोधामुळें त्याच्या शरिराला कंप सुटला, तो आपले ओठ चावूं लागला-व कोपानें त्याचे नेत्र अत्यंत प्रज्वलित झाले. त्याला आकाश धूम्रवर्ण झालेलें दिसूं लागलें. भयंकर दाढांमुळें त्याची दृष्टि उग्र होऊन वांकड्या भुवयांमुळें त्याचें मुख आव अवलोकन करण्यासहि अशक्यझालें. अशा स्थितींत तो हिरण्यकशिपु, हातांतील शूळ वर उचलून सभेमध्यें दानवांना उद्देशून बोलूं लागला ॥२॥३॥ तो म्हणाला, हे शकुनिप्रभृति दैत्य–दानव हो, हे द्विमूर्धन्, हे त्र्यक्षा, हे शंबरा, हे शतबाहो, हे हयग्रीवा, हे नमुचे, हे पाका, हे इल्वला, हे विप्रचित्ते आणि हे पुलोम्या, तुम्ही सर्व जण माझें वचन श्रवण करा व विलंब न करतां सत्वर त्याप्रमाणें आचरण करा ! ॥ ४ ॥ ५ ॥ अहो, समदृष्टि असूनहि भजननिमित्तानें साहाय्यक झालेल्या श्रीहरीच्या आधारानें हे आमचे क्षुद्र शत्रु जे देव, त्यांनीं माझ्या अत्यंत प्रिय भ्रात्याचा वध केला ॥ ६ ॥ त्या,—स्वतः शुद्ध तेजोमय असून जो जो आपली भक्ति करील त्याला त्याला अनुसरणाऱ्या, मायेनें वराहरूप धारण करणाऱ्या, बालकाप्रमाणें अस्थिरचित्त आणि आपल्या 'समत्वरूप' स्वभावाचा त्याग करणाऱ्या,—श्रीहरीचा कंठ मी आपल्या शूळानें विदीर्ण करून, त्यांतील विपुल रक्तानें जेव्हां आपल्या रक्तप्रिय भ्रात्याचें तर्पण करीन, तेव्हां माझ्या अंतःकरणांतील व्यथा नाहींशी होईल ॥ ७ ॥ ८ ॥ ज्याप्रमाणें वृक्षाचें मूळ तोडलें असतां शाखा आपोआप शुष्क होऊन जातात, त्याप्रमाणें तो कपटी प्रतिपक्षी नाहींसा झाला असतां, देव स्वतःच नाश पावतील. कारण, विष्णु हाच त्यांचा प्राण आहे ॥ ९ ॥ यास्तव, ह्या क्षणींच तुम्हीं ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांनीं समृद्ध झालेल्या भूमीवर जा आणि जे जे म्हणून तप, यज्ञ, वेदाध्ययन, व्रत आणि दान करीत असतील त्यांचा घात करा ! ॥ १० ॥ हे दैत्य हो, हा पुरुषोत्तम विष्णु यज्ञरूप असून धर्ममय असल्यामुळें द्विजांचें अनुष्ठान हेंच त्याचें मूळ आहे आणि देव, ऋषि, पितर, भूतें व धर्म यांचा मुख्य आश्रयहि तोच आहे. ॥ ११ ॥ म्हणून जेथें जेथें द्विज, गाई, वेद, वर्णाश्रम व वर्णाश्रमविहित कर्में चालत असतील त्या त्या देशीं जाऊन तुम्हीं तीं जाळून टाका ! ॥ १२ ॥ अशी ही आपल्या स्वामीनें केलेली आज्ञा आदरपूर्वक शिरसा मान्य करून ते हिंसाप्रिय दानव त्याप्रमाणें लोकांचा संहार करूं लागले ॥ १३ ॥ हे हे धर्मराजा, नगरें, गांव, गोठे, बागा, शेतें, आरामस्थानें, ऋषींचे आश्रम, खाणी, शेतकऱ्यांचीं घरें, डोंगरांच्या दऱ्यांत असलेलीं खेडीं, गौळवाडे आणि राजधान्या, वगैरे त्या दानवांनीं जाळून टाकलीं ॥ १४ ॥ कांहीं जणांनीं खोरीं, कुदळीं घेऊन पूल, कोट आणि

वेशी पाडल्या; कांहींनीं हातांमध्यें कुऱ्हाडी घेऊन लोकांच्या निर्वाहाला साधनभूत असलेले वृक्ष तोडले आणि कांहीं जणांनीं जळक्या लाकडांनीं लोकांचीं घरें जाळलीं ॥ १५ ॥ ह्याप्रमाणें दैत्यराज हिरण्यकशिपूचे ते आज्ञाधारक दैत्य वारंवार लोकांना उपद्रव देऊं लागले असतां, यज्ञसंबंधीं हविर्भाग मिळत नाहींसा झाल्यामुळें, देव स्वर्गाचा त्याग करून गुप्तरीतीनें भूमीवर संचार करूं लागले ॥ १६ ॥ हे धर्मराजा, इकडे भ्रातृमरणामुळें दुःखित झालेल्या हिरण्यकशिपूनें आपल्या हिरण्याक्ष भ्रात्याचें उत्तरकार्य केलें आणि मग तो त्याच्या पुत्रांचें सांत्वन करूं लागला ॥ १७ ॥ हे धर्मराजा, देश व काल जाणणारा तो हिरण्यकशिपु, मधुर वाणीनें शकुनि, शंबर, धृष्ट, भूतसंतापन, वृक, कालनाभ, महानाभ, हरिश्मश्रु आणि उत्कच ह्यांना व रुषाभानुनामक त्यांच्या मातेला आणि आपली माता जी दिति तिला उद्देशून बोलूं लागला ॥ १८ ॥ १९ ॥

हिरण्यकशिपु म्हणाला,--हे आई, हे माते, हे वहिनी, आणि हे पुत्रहो, वीर हिरण्याक्षाकरितां शोक करणें तुम्हांला योग्य नाहीं. कारण, शत्रूच्या सम्मुख होणारा जो वध तो स्तुत्य असल्यामुळें शूरांना इष्टच आहे ॥ २० ॥ हे सुव्रते माते, पाणपोईमध्यें ज्याप्रमाणें प्राण्यांचा सहवास क्षणिक असतो, त्याचप्रमाणें ह्या मृत्युलोकीं माता व पुत्र इत्यादिकांचा सहवास क्षणिक असतो. कारण, दैवयोगानें प्राणी एकत्र संयुक्त होतात व पुनरपि आपआपल्या कर्मामुळें वियुक्त होतात ॥ २१ ॥ हे माते, आत्मा हा मृत्युरहित, अक्षय, निर्मळ, सर्वव्यापी आणि सर्वज्ञ असा आहे. कारण, तो देहादिकांहून भिन्न आहे; म्हणून मृत, कृश, मलिन, वियुक्त, अज्ञ असें समजून त्याबद्दल शोक करणें योग्य नाहीं. हे माते, हा आत्मा हा आपल्या अविद्येमुळें मोहित होऊन सुखःदुखादिकांचा विशेषें करून स्वीकार करीत असल्यामुळें शरीर धारण करतो. सारांश, त्याला लिंगशरीररूप जो उपाधी प्राप्त झाला आहे तोच संसार होय ॥ २२ ॥ हे माते, जसे उपाधीचे धर्म उपाधियुक्त वस्तूवर भासमान होतात, म्हणजे ज्याप्रमाणें उदक हालत असल्यामुळें त्यामध्यें प्रतिबिंबित झालेले वृक्षहि हालत आहेत असें दिसतें अथवा ज्याप्रमाणें नेत्रांना भ्रमण झाल्यामुळें पृथ्वी हालल्यासारखी दिसते. त्याप्रमाणें हे माते, गुणांच्या योगानें मनाचें भ्रमण झालें म्हणजे आत्मा वस्तुतः परिपूर्ण असूनहि त्या मनासारखाच आणि वस्तुतः देहादिसंबंधरहित असतांहि तो देहधारी असल्यासारखा दिसतो ॥ २३॥२४॥ म्हणून वस्तुतः देहादिसंबंध नसतांहि त्याविषयीं देहाभिमान असणें, प्रिय वस्तूशीं वियोग अप्रिय वस्तूंशीं संयोग, कर्म, अनेक योनींमध्यें प्रवेश, नंतर उत्पत्ति, विनाश, नाना प्रकारचा शोक, अविवेक, चिंता आणि विवेकाची विस्मृति इत्यादि हे सर्व धर्म आत्मस्वरूपाहून अगदीं निराळे असल्यामुळें त्यांचा आत्मस्वरूपाशीं मुळींच संबंध नाहीं ॥ २५ ॥ २६ ॥ असो. शोकाचें कारण नसूनहि तुम्हीं हा व्यर्थ शोक करीत आहां. तरी ह्याविषयीं कोणा एका मृतपुरुषाचे स्त्रीपुत्रादिक आप्त

आणि यम ह्यांचा संवादरूप इतिहास लोक सांगत असतात तो तुम्हीं आतां श्रवण करा ! ॥ २७ ॥ उशीनर देशामध्यें सुयज्ञ म्हणून प्रसिद्ध असा एक राजा होता. त्याचा शत्रूंनीं युद्धामध्यें वध केला असतां, त्याचे सर्व नातलग त्याच्या सभोंवतीं जमून शोक करीत बसले ॥ २८ ॥ हे माते, त्याच्या रत्नमय कवचाचे तुकडेतुकडे होऊन गेले होते. त्याच्या शरीरावरील भूषणें व माळा गळून गेल्या होत्या. बाणांनीं हृदय विदीर्ण झालें होतें व सर्वांग रक्तानें भरून तो भूमीवर पडला होता. त्याचे केस अस्ताव्यस्त झाले होते, डोळे फुटले होते, आवेशामुळें त्यानें आपला ओंठ चावला होता. त्याचें मुखकमळ धुळीनें भरलें होतें आणि त्याचें आयुध व भुजा हीं युद्धामध्यें छिन्नभिन्न झालीं होतीं ॥ २९ ॥ ॥ ३० ॥ याप्रमाणें प्रारब्धकर्मामुळें तशा स्थितीमध्यें असलेला जो आपला भर्ता उशीनरदेशाचा राजा, त्याला अवलोकन करून त्याच्या राण्या दुःखित झाल्या ' आणि हे नाथा, आमचा सर्वस्वीं घात झाला. ' असें म्हणून वारंवार हातांनीं ऊर बडवून घेत त्या त्याच्या पायांजवळ शोक करीत पडल्या ॥ ३१ ॥ उच्च स्वरानें रोदन करीत असतां त्यांच्या स्तनांवरील केशरानें रक्तवर्ण झालेल्या अश्रूंनीं, आपल्या प्रिय पतीचे पाय त्यांनीं भिजविले. केस मोकळे टाकून व अलंकारांचा त्याग करून त्या आक्रोशपूर्वक विलाप करूं लागल्या. त्यांचा विलाप पाहून लोकांनाहि दुःख झालें ॥ ३२ ॥ त्या म्हणाल्या,— हे प्राणप्रिय प्रभो, ज्या विधात्यानें आमच्या दृष्टीच्या पलीकडील स्थितींत तुला नेलें, तो खरोखर निर्दय आहे. कारण, तूं पूर्वीं उशीनर देशांतील लोकांची उपजीविका चालविणारा राजा असतां आतां त्या विधात्यानें तुला त्यांच्या शोकांची वृद्धि करणारा केलें आहे ॥ ३३ ॥ हे भूपते, सर्वोत्कृष्ट मित्र असा जो तूं, त्या तुजवांचून आम्ही कसें बरें राहावें ? यास्तव हे वीरा, ज्या ठिकाणीं तूं जावयाला निघाला आहेस, त्या ठिकाणीं तुझ्या चरणकमळाची सेवा करणाऱ्या आम्हांलाहि आपल्या मागोमाग येण्याची आज्ञा दे ! ॥ ३४ ॥ ह्याप्रमाणें आपल्या मृत पतीला आलिंगन देऊन,—त्याचें शव दहन करण्यासहि नेण्याची इच्छा न करतां,— त्या स्त्रिया सारख्या विलाप करीत बसल्या असतां, सूर्य अस्तास गेला ॥ ३५ ॥ तेव्हां त्या मृत पुरुषाच्या आप्त जनांचा तो विलाप ऐकून यम स्वतः बालरूपानें तेथें आला व त्यांची समजूत करूं लागला ॥ ३६ ॥

यम म्हणाला,—अहो, काय आश्चर्य हें ? अरे, आमच्यापेक्षां वयानें अधिक असून, लोकांचा जन्ममरणादि प्रकार नित्य अवलोकन करीत असतांहि ह्यांना केवढा हा मोह प्राप्त झाला आहे ! आपणहि मरणधर्मानें युक्त असून ज्या अव्यक्त रूपापासून हा प्राणी जन्मास आला, तेथेंच तो गेला असतां त्याच्याविषयीं हे व्यर्थ शोक करीत आहेत ॥ ३७ ॥ अहो, ह्या लोकीं मातापितर आम्हांला दुर्बळ स्थितींत सोडून गेले

असतांहि, लांडगे आदिकरून प्राण्यांनीं आम्हांला भक्षण केलें नाहीं आणि ज्यानें गर्भामध्येंहि आमचें रक्षण केलें, तोच इतर सर्वत्रहि आमचें रक्षण करील, असें समजून आपल्या रक्षणाचीहि आम्ही चिंता करीत नाहीं; तेव्हां सर्वापेक्षां आम्ही धन्य आहों ॥ ३८ ॥ हे अबलांनो, जो ईश्वर स्वतः नाशरहित असून स्वेच्छेनें हें विश्वउत्पन्न करतो व त्याचा संहारहि करतो, त्या ईश्वराचें हें चराचर विश्व क्रीडासाधन आहे असें म्हणतात; म्हणूनच तो त्याचें पालन व संहार करण्यास समर्थ आहे. ॥ ३९ ॥ मार्गामध्येंहि पडलेली वस्तु दैव राखीत असतां तशीच सुखरूप राहत्ये व दैवानें ज्या वस्तूची उपेक्षा केली, ती गृहामध्यें असली तरी नाहींशी होत्ये. त्याप्रमाणेंच एखादा पुरुष नाथ असूनहि दैवानें त्याच्यावर कृपादृष्टि ठेवली असतां तो वनामध्येंहि जिवंत राहतो आणि दैवानें ज्याची उपेक्षा केली असतां तो पुरुष गृहामध्यें असूनहि जगत नाहीं ॥ ४० ॥ हे अबलांनो, सर्व देह लिंगशरिरापासून झालेल्या नाना प्रकारच्या कर्मांमुळें त्या त्या काळीं उत्पन्न होतात व नाशहि पावतात; परंतु आत्मा हा त्या वेळीं देहामध्यें असूनहि त्याहून अत्यंत विलक्षण असल्यामुळें त्या शरिराच्या जन्मादि धर्मांनीं तो बद्ध होत नाहीं ॥ ४१ ॥ हे स्त्रियांनो, ज्याप्रमाणें अत्यंत अविवेकी पुरुषानें आपलें म्हणून मानलेलेंहि घर त्याच्याहून निराळें असतें त्याचप्रमाणें अविवेकानें आपलें म्हणून भासत असलेलें हें पुरुषाचें शरीर पंचमहाभूतात्मक असून दृष्टिगोचर होत असल्यामुळें अभौतिक आणि साक्षीभूत अशा पुरुषापासून वस्तुतः पृथकच आहे. जसें उदकापासून झालेले बुडबुडे, पृथ्वीपासून झालेले घट व तेजापासून झालेले कुंडलादिक अलंकार नाश पावतात; त्याप्रमाणें त्या तिन्ही भूतांच्या परमाणूंनीं उत्पन्न झालेला देहच काळामुळें परिणत होऊन नाश पावतो; पण आत्मा नाश पावत नाहीं. ॥ ४२ ॥ जसा अग्नि काष्ठामध्यें असतांहि प्रकाशकरूपानें व दाहकरूपानें निराळाच अनुभवास येतो आणि जसा देहांत असलेला वायु, मुख व नासिका इत्यादि स्थानांमध्यें निराळाच प्रतीतीला येतो, तसा आत्मा देहामध्यें असूनहि त्याहून भिन्न आहे. कारण, आत्मा देहामध्यें असतांनाहि त्याच्या ठिकाणीं देहधर्म मुळींच नसतात; जसें आकाश सर्वत्र ठिकाणीं असूनहि तें कोठें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा देहेंद्रियादि सर्व गुणांच्या आश्रयानें असतांहि त्याहून निराळाच आहे ॥ ४३ ॥ आणि त्यांतूनहि, हे मूढ हो, ज्याकरितां तुम्ही शोक करीत आहां, तो हा तुमचा भर्ता सुयज्ञ तर येथें शयन करीत आहेच; तेव्हां तुम्ही कोणाकरितां शोक करीत आहां बरें ? पूर्वीं ह्या ठिकाणीं जो श्रवण करीत होता व प्रत्युत्तर देत होता, तो सुयज्ञ वस्तुतः कधींहि दृष्टिगोचर होत नव्हता ॥ ४४ ॥ सर्व इंद्रियांच्या चेष्टांना कारण असल्यामुळें मोठा व मुख्य असा जरी प्राण आहे, तथापि ह्या देहांतील श्रोता व वक्ता हा नव्हे. हे स्त्रियांनो, इंद्रियांच्या योगानें त्यांचे विषय जाणणारा जो आत्मा तो तर, प्राण व देह ह्या दोन्ही अचेतन वस्तूंहून वेगळा असून सचेतन आहे ॥ ४५ ॥ तो सर्वव्यापी आत्मा, भूतें, इंद्रियें आणि मन, ह्यांच्या योगानें लक्षित होणाऱ्या बऱ्यावाईट देहांचा

स्वीकार करतो; परंतु तो त्याच्याहून भिन्न आहे. कारण आपल्या विवेकबलाच्या योगानें त्यांचा तो त्यागहि करतो ॥ ४६ ॥ जोंपर्यंत आत्म्याला लिंगशरिराचा अभिमान असतो, तोंपर्यंत त्याचें तें कर्म, बंधनाला कारण होतें व त्यापासून देहधर्मांचें भोक्तृत्व त्याला प्राप्त होऊन क्लेश होतात; पण लिंगशरिराविषयींचा अभिमान निवृत्त झाल्यानंतर असा प्रकार घडत नाहीं. कारण हा देहधर्मभोक्तृत्वरूप विपर्यय मायेनें होत असतो, तो वस्तुतः खरा नाहीं ॥ ४७ ॥ सुखदुःखादि गुणकार्यें खरीं आहेत असें मानणें व म्हणणें हा अगदीं व्यर्थ अभिमान होय. कारण, जाग्रदावस्थेमध्यें मनोरथानें प्राप्त होणारें राज्यादि सुख अथवा स्वप्नावस्थेमध्यें प्राप्त होणारें स्त्रीसंभोगादि सुख जसें वस्तुतः खरें नाहीं, तसेंच सर्व इंद्रियजन्य सुखहि वस्तुतः खरें नाहीं ॥ ४८ ॥ वास्तविक आत्मा नित्य असून देह अनित्य आहे असें जाणणारे लोक आत्म्याविषयीं अथवा देहाविषयीं ह्या संसारामध्यें शोक करीत नाहींत. शोक करणाऱ्यांचा स्वभाव निवृत्त करणें अशक्य आहे. ज्ञान दृढ झाल्यावांचून तो स्वभाव जात नाहीं ॥४९॥ हे स्त्रियांनो, पक्ष्यांना मारणारा कोणी एक पारधी अरण्यामध्यें ईश्वरानें निर्माण केला होता. तो जेथें जेथें ते पक्षी असत तेथें तेथें धान्यकणादिकांनीं त्यांना लोभ उत्पन्न करीत असे आणि जाळें पसरून त्यांना धरीत असे ॥५०॥ एकदां एक कुलिंगपक्ष्यांचें जोडपें त्या ठिकाणीं संचार करीत असतांना त्या व्याधाच्या दृष्टीस पडलें. तेव्हां त्या उभयतांपैकीं कुलिंगीला त्यानें धान्य पसरलेलें दाखवून एकाएकीं मोहित केलें ॥ ५१ ॥ नंतर काळानें प्रेरित झालेली ती कुलिंगी दोऱ्यामध्यें अडकली. ती तशा प्रकारच्या संकटांत सांपडून अगदीं दीन झाली आहे असें कुलिंगपक्ष्यानें अवलोकन करतांच तो अत्यंत दुःखित झाला; पण तिला सोडविण्याविषयीं तो असमर्थ असल्यामुळें अगदीं दीन होऊन प्रेमामुळें एका वृक्षाच्या शाखेवर बसून विलाप करूं लागला ॥ ५२ ॥ तो म्हणाला,—अहो ! हा निर्दय ब्रह्मदेव, सर्वप्रकारें दयेस पात्र अशा मज दीनाकरितां शोक करणाऱ्या ह्या माझ्या दीन स्त्रीला नेऊन काय बरें करणार आहे ? ॥ ५३ ॥ अरेरे, विधुरावस्थेंत दीन होऊन दुःखानें जिवंत राहणाऱ्या ह्या माझ्या अर्ध्या देहाचें आतां मला काय बरें प्रयोजन आहे ? ह्यास्तव आतां तो यमराज मलाहि खुशाल नेवो ! ॥ ५४ ॥ हे परमेश्वरा, जीं माझीं दुर्दैवी बाळें खाण्याकरितां घरट्यामध्यें मातेची वाट पाहात आहेत, ज्यांना अद्याप पंखसुद्धां फुटले नाहींत, त्या पोरक्या बालकांचें मी आतां पोषण कसें करूं ? ॥ ५५ ॥ ह्याप्रमाणें प्रियेच्या वियोगानें व्याकुळ झाल्यामुळें अश्रूंनीं कंठ दाटून येऊन तो कुलिंगपक्षी विलाप करीत असतां काळानें प्रेरणा केलेल्या त्याच पक्षिघातक्यानें दडून बसून त्याला बाण मारला ॥ ५६ ॥ असो. हे मूढ स्त्रियांनो, त्या पक्ष्याप्रमाणेंच आपला मृत्यु न जाणून शेंकडों वर्षें जरी तुम्ही शोक करीत बसला, तथापि हा पति तुम्हांला पुन्हा प्राप्त होणार नाहीं ! ॥ ५७ ॥

हिरण्यकशिपु म्हणाला,—हे माते, ह्याप्रमाणें तो बालक भाषण करीत असतां सुयज्ञराजाचे सर्व नातलग मनामध्यें विस्मित झाले आणि हें सर्व जगत् अनित्य असून मिथ्यारूपानेंच प्रगट झालें आहे असें मानूं लागले ॥ ५८ ॥ असो. यमधर्म हें आख्यान

सांगून त्याच ठिकाणीं गुप्त झाला व त्या नातेवाइकांनींहि सुयज्ञाचें परलोकप्राप्तीविषयीं करावयाचें सारें उत्तरकार्य केलें ॥ ५९ ॥ यास्तव स्वतःकरितां तसेंच दुसऱ्याकरितां तुम्हीं मुळींच शोक करूं नका ! कारण, अमुक आपलें व अमुक दुसऱ्याचें अशा अभिमानरूप अज्ञानावांचून संसारांत प्राणिमात्रांना स्वतः कोण व इतर कोण ? स्वकीय कोण व परकीय तरी कोण आहे ? सर्व एकच आहे ॥ ६० ॥

नारद म्हणाला,--हे धर्मराजा, ह्याप्रमाणें दैत्याधिपति हिरण्यकशिपूचें भाषण सुनेसह श्रवण केल्यावर दितीनें एका क्षणामध्यें पुत्रशोकाचा त्याग केला आणि आपलें मन आत्मस्वरूपीं लावलें ॥ ६१ ॥

## दुसरा अध्याय समाप्त

# अध्याय ३ रा

नारद म्हणाला,-हे धर्मराजा, हिरण्यकशिपूनें, आपण अजिंक्य, अजरामर, प्रतिपक्षशून्य आणि अद्वितीय प्रभु व्हावें असें मनांत आणलें आणि त्यासाठीं मंदरपर्वताच्या दरीमध्यें बाहू वर करून, आकाशाकडे दृष्टि ठेवून आणि एका पायाच्या अंगठ्यावर उभें राहून अतिभयंकर तप केलें ॥१॥२॥ त्या वेळीं प्रलयकाळचा सूर्य जसा शोभतो, त्याप्रमाणें जटांच्या कांतीनें तो शोभूं लागला. याप्रमाणें तो तप करूं लागला असतां, पूर्वी गुप्तरीतीनें भूमीवर संचार करीत असलेले देव फिरून आपआपल्या स्थानांवर गेले ॥ ३ ॥ नंतर त्याच्या मस्तकांतून धुरासह निघालेला तपोमय अग्नि सर्वत्र पसरून त्यायोगें, खालीं, वरतीं व मध्यें असलेले सर्व लोक संतप्त झाले ॥ ४ ॥ आणि नद्या व समुद्र क्षुब्ध होऊन गेले, द्वीपें व पर्वत ह्यांसह भूमि कांपूं लागली, ग्रहांसह नक्षत्रें गळून पडूं लागलीं आणि दशदिशा प्रज्वलित होऊं लागल्या ॥ ५ ॥ नंतर त्या अग्नीनें तप्त झालेले देव स्वर्गाचा त्याग करून ब्रह्मलोकीं गेले आणि ब्रह्मदेवाला विनंती करून म्हणाले,-हे ' जगत्पते, हे देवाधिदेवा, दैत्यश्रेष्ठ हिरण्यकशिपूच्या तपानें संतप्त झाल्यामुळें आम्ही स्वर्गावर राहण्यास समर्थ नाहीं. यास्तव हे माहात्म्या सर्वाधिपते, तुझी पूजा करणाऱ्या लोकांचा जोंपर्यंत नाश झाला नाहीं, तोंपर्यंत जर तुला वाटत असेल तर त्याचें तूं निवारण कर ! ॥ ६ ॥ ७ ॥ हे जगदीशा, दुश्चर तप करणाऱ्या त्या हिरण्यकशिपूचा संकल्प तुम्हांला ठाऊक नाहीं काय ? नसेल तर आम्ही निवेदन करतों तो श्रवण करावा ॥ ८ ॥ हे ईश्वरा, त्यानें असें ठरविलें आहे कीं, " तप व योग ह्यांच्या एकनिष्ठ आचरणानें चराचर विश्व उत्पन्न करून ब्रह्मदेव ज्याप्रमाणें सर्व स्थानापेक्षां श्रेष्ठ अशा आपल्या सत्य लोकरूप स्थानावर बसला आहे, त्याप्रमाणें तप व योग ह्यांच्या वृद्धिंगत होणाऱ्या तेजाच्या योगानें तें स्थान आपणहि प्राप्त करून घेऊं. कारण, काल नित्य आहे व आत्माहि अमर आहे. ॥ ९ ॥ १० ॥ तपोबलाच्या योगानें पूर्वीपेक्षां हें जगत् मी अगदीं निराळ्या प्रकारचें करीन; ( म्हणजे ब्रह्मचर्यव्रतादिक पुण्य-कर्में करणारांस नरकादि दुःखेंच भोगावयास लावीन व विषयासक्त असून पापकर्में करणारांस स्वर्गसुखाचा उपभोग घ्यावयास लावीन आणि स्वर्ग हें असुरांचें स्थान आणि नरक हें देवांचें स्थान असें करीन ) अवतारकल्पाच्या अंतीं कालानें नाश पावणारीं वैष्णवादि इतर स्थानें मला काय करावयाचीं आहेत ? ॥ ११ ॥ असो. हे त्रैलोक्याधिपते, ह्याप्रमाणें तुझें स्थान हरण करण्याविषयीं त्याचा निश्चय झालेला आम्हीं श्रवण केला आहे आणि हें मोठें तप तरी तो त्यासाठींच करीत बसला आहे. यास्तव त्याविषयीं आतां जें योग्य असेल तें तूं स्वतः कर !॥ १२ ॥ हे ब्रह्मदेवा, तूं ज्या स्थानावर विराजमान झाला आहेस त्या स्थानाचा अधिकार म्हणजे द्विज व गाई यांची उत्पत्ति करणें, त्यांना सुख व ऐश्वर्य देऊन त्यांचें क्षेम आणि उत्कर्ष करणें हाच होय ॥ १३ ॥ हे धर्मराजा, या-

प्रमाणें भगवान् ब्रह्मदेवाची देवांनीं प्रार्थना केली असतां भृगु, दक्ष इत्यादि प्रजाधिपतींनीं वेष्टिलेला तो ब्रह्मदेव, हिरण्यकशिपूच्या आश्रमास गेला ॥ १४ ॥ पण तेथें त्याला हिरण्यकशिपु प्रथम दिसला नाहीं. त्याचें शरीर वारुळें, गवत व वेळूचीं बेटें यांनीं आच्छादून गेलें होतें व त्यांतील मेद, त्वचा, मांस आणि रक्त, हीं मुंग्यांनीं खाऊन टाकलीं होतीं ॥ १५ ॥ थोड्या वेळानें मेघांनीं आच्छादित झालेल्या सूर्याप्रमाणें वारुळादिकांनीं आच्छादिलेल्या व तपाच्या योगानें लोकांना त्रास देणाऱ्या त्या हिरण्यकशिपूला त्यानें पाहिलें. त्या स्थितींत त्याला पाहून ब्रह्मदेव विस्मित झाला आणि हंसतहंसत त्याला उद्देशून बोलूं लागला ॥ १६ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—हे कश्यपपुत्रा हिरण्यकशिपो, तुझें कल्याण असो. तपाच्या योगानें तूं कृतार्थ झाला आहेस. मी तुला वर देण्याकरितां येथें प्राप्त झालों आहें, तरी तूं मजपासून इच्छित वर मागून घे ! ॥ १७ ॥ हें तुझें मोठें अद्भुत धैर्य मीं पाहात आहें. अरे, वनमक्षिकांनीं तुझा देह भक्षण केला असून तुझे प्राण केवळ अस्थींचा आश्रय करून राहिले आहेत ॥ १८ ॥ असें तप पूर्वींच्या ऋषींनीं कधींच केलें नाहीं, व पुढेंहि कोणी करणार नाहींत. उदकसुद्धां प्राशन न करणारा कोणता पुरुष देवांचीं शंभर वर्षेंपर्यंत प्राणांचें धारण करील ? ॥ १९ ॥ हे दितिपुत्रा, मोठा मनोनिग्रह करणाऱ्या पुरुषांना करण्यास दुष्कर असा निश्चय करून तपोनिष्ठ झालेल्या तूं खरोखर मजवरहि विजय मिळविला आहेस ! ॥ २० ॥ यास्तव हे असुरश्रेष्ठा, तुझे सर्व मनोरथ मी परिपूर्ण करतों; कारण मर्त्य अशा तुला अमर अशा माझें जें दर्शन झालें आहे तें निष्फळ होणार नाहीं ! ॥ २१ ॥

नारद म्हणाला,— हे धर्मराजा, असें भाषण करून ब्रह्मदेवानें अमोघ सामर्थ्यानें युक्त अशा आपल्या कमंडलूंतील जलानें, मुंग्यांनीं भक्षण केलेल्या हिरण्यकशिपूच्या त्या देहावर प्रोक्षण केलें ॥ २२ ॥ तें प्रोक्षण होतांच तो हिरण्यकशिपु मानसिक शक्ति, इंद्रियशक्ति व शारीरिक शक्ति ह्यांनी युक्त होऊन सर्व अवयवांनीं संपन्न, वज्रासारखा दृढशरीरी, तरुण व तापलेल्या सुवर्णासारखा तेजस्वी झाला व जसा काष्ठापासून अग्नि प्रगट होतो, त्याप्रमाणें वेळूंनीं आच्छादिलेल्या वारुळांतून तो निघाला ॥ २३ ॥ तेव्हां समोर आकाशामध्यें असलेला ब्रह्मदेव त्याच्या दृष्टीस पडतांच त्याच्या दर्शनानें तो आनंदित झाला आणि त्यानें त्याला भूमीवर साष्टांग नमस्कार घातला ॥ २४ ॥ नंतर तो उठून उभा राहिला. त्याच्या नेत्रांमध्यें हर्षामुळें आनंदाश्रु आले व शरिरावर रोमांच उभे राहिले. अशा स्थितींत हात जोडून, नम्रपणें ब्रह्मदेवाकडे पाहात तो गद्गद वाणीनें ब्रह्मदेवाची स्तुति करूं लागला ॥ २५ ॥

हिरण्यकशिपु म्हणाला, – कल्पाच्या अंतीं, काळानें निर्माण केलेल्या प्रकृतिगुणरूप निबिड अंधःकारानें व्याप्त झालेलें हें जग, ज्या स्वयंप्रकाश ईश्वरानें आपल्या प्रकाशानें प्रकाशित केलें आणि जो त्रिगुणात्मक अशा आपल्या स्वरूपानें ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय करतो, त्या रज, सत्त्व व तम ह्यांना आश्रयभूत असलेल्या

महात्म्या परमेश्वराला माझा नमस्कार असो ! ॥ २६॥२७ ॥ जो सर्वांचा आदि असून बीजभूत कारण आहे, ज्ञान आणि विज्ञान हेंच ज्याचें स्वरूप आहे व ज्याला प्राण, इंद्रियें, मन आणि बुद्धि ह्यांच्या कार्यामुळें व्यक्त आकार प्राप्त होतो, त्या तुला नमस्कार असो ! ॥ २८ ॥ हे विधात्या, तूंच सूत्रात्मक मुख्य प्राणांच्या योगानें स्थावरजंगमात्मक विश्वाचें नियमन करीत असल्यामुळें प्रजांचा व चित्त, चेतना, मन आणि इंद्रियें ह्यांचाहि स्वामी आहेस. तसाच तूं महतत्त्वरूप असल्यामुळें आकाशादि भूतें, शब्दादि विषय आणि तत्संबंधीं वासना, ह्यांचा उत्पादक आहेस ॥ २९ ॥ होता, अध्वर्यु इत्यादिक चार ऋत्विजांनीं युक्त अशा यज्ञकर्माचें प्रतिपादन करणाऱ्या तीन वेदांच्या रूपानें तूंच अग्निष्टोमादि सात यज्ञांचा विस्तार करतोस. तूं प्राण्याचा आत्मा आणि अंतर्यामी असून काळानें व देशानें अमर्यादित, अखंड असा अनादि व सर्वज्ञ आहेस ॥ ३० ॥ नित्य जागृत असा तूंच काळरूपी होऊन त्याकाळाच्या लवादिक अवयवांनीं लोकांचें आयुष्यक्षीण करतोस; परंतु वस्तुतः तूं ज्ञानरूप अपरिच्छिन्न परमेश्वर आणि जन्मशून्य असल्यामुळें निर्विकार आहेस. जीवलोक कर्मवश असल्यामुळें त्याला जन्मादि विकार घडतात; परंतु तूं त्या जीवलोकाचा नियंता असल्यामुळें त्याच्या जीवनाचेंहि कारण तूंच आहेस ॥ ३१ ॥ हे देवा, स्थावर अथवा जंगम असें कोणतेंहि कारण अथवा कार्य तुझ्याहून निराळें नाहीं. हे विधात्या, विद्या आणि कला ह्या सर्व तुझ्याच तनु आहेत. हिरण्यरूप ब्रह्मांड तुझ्या गर्भामध्यें असून तूं त्रिगुणात्मक मायेहून निराळा ब्रह्मरूप आहेस ॥ ३२ ॥ हे सर्व व्यापका, हें व्यक्त ब्रह्मांड म्हणजेच तुझें स्थूल शरीर होय. त्याच्या योगानें तूं इंद्रियें, प्राण व मन ह्यांच्या विषयांचा उपभोग घेतोस. आपल्या स्वरूपीं स्थित असूनच तूं हा उपभोग घेत असल्यामुळें तूं उपाधिशून्य, ब्रह्मरूप व पुराणपुरुष असा ॥ ३३ ॥ हे अनंता, आपल्या अव्यक्तरूपानें हें सर्व जग ज्यानें व्यापून टाकलें आहे आणि ज्याचें ऐश्वर्य, विद्या व माया ह्यांनीं युक्त असल्यामुळें अचिंत्य आहे, त्या तुला नमस्कार असो ! ॥ ३४ ॥ हे वरदोत्तमा, जर मला पाहिजे असलेले वर देत असलास तर हे प्रभो, तूं उत्पन्न केलेल्या भूतापासून मला मृत्यु प्राप्त होऊं नये ॥ ३५ ॥ त्याच-प्रमाणें घराच्या आंत अथवा बाहेर, दिवसा अथवा रात्रीं तूं उत्पन्न केलेल्या प्राण्यांकडून किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्राण्यांपासून, भूमीवर अथवा आकाशामध्यें, मनुष्य, मृग, असुर, देव, महानाभ, आणि आणखीहि ज्या कांहीं सचेतन किंवा अचेतन वस्तु असतील त्या-पासून मला मृत्यु प्राप्त होऊं नये. तसेंच ज्याप्रमाणें तुझा महिमा आहे त्याप्रमाणें माझा होऊन मला युद्धामध्यें कोणी प्रतिपक्षी नसावा. सर्व प्राण्यांचा अधिपति मी एकटाच असावें आणि तप व योग ह्यांच्या योगानें प्रभावशाली अशा लोकांचें जें अणिमादि ऐश्वर्य कधींहि नाश पावत नाहीं, तें मला प्राप्त व्हावें असे वर तूं मला दे ! ॥ ३६ ॥ ३७ ॥ ३८ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

# अध्याय ४ था

नारद म्हणाला, —हे धर्मराजा, ह्याप्रमाणें हिरण्यकशिपूनें ब्रह्मदेवापाशीं वर मागितले असतां, त्याच्या तपानें प्रसन्न झालेल्या त्या ब्रह्मदेवानें अत्यंत दुर्लभ असेहि वर दिले ॥ १ ॥

ब्रह्मदेव म्हणाला, —'बा दैत्यराजा, तूं जे मजपाशीं वर मागत आहेस ते पुरुषांना प्राप्त होण्यास दुर्लभ आहेत; तथापि, हे दैत्यश्रेष्ठा, ते दुर्लभवर देखील मी तुला देतों.' ॥ २ ॥ वर मिळाल्यावर ज्याचा अनुग्रह कधींच निष्फळ होत नाहीं अशा त्या भगवान् ब्रह्मदेवाची असुरश्रेष्ठ हिरण्य॰ कशिपूनें पूजा केली व मरीच्यादि प्रजापति त्याची स्तुति करीत असतां तो स्वस्थानीं निघून गेला ॥ ३ ॥ ह्याप्रमाणें वर प्राप्त झालेला तो दैत्य सुवर्णासारखें तेजःपुंज॰ शरीर धारण करून आपल्या भ्रात्याच्या वधाचें स्मरण करीत भगवंताचा द्वेष करूं लागला ॥ ४ ॥ त्या जगद्विजयी महादैत्यानें सर्व दिशा, तिन्ही लोक, देव, असुर व मानव यांचे राजे, गंधर्व, गरुड, नाग, सिद्ध, चारण, विद्याधर, ऋषि व पितृगण यांचे अधिपति, मनु, यक्ष, राक्षस व पिशाच ह्यांचे अधिपति, प्रेतें व भूतें ह्यांचे स्वामी आणि सर्व प्राण्यांचे अधिपति ह्या सर्वांना जिंकून आपल्या आधीन करून घेतलें व लोकपालांचीं स्थानें त्यानें त्यांच्या तेजासह हरण केलीं ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ नंतर तो हिरण्यकशिपु देवांचें शोभायमान असें क्रीडावन ज्यांत आहे अशा स्वर्गलोकीं गेला आणि तेथें विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें त्रैलोक्यलक्ष्मीचें केवळ वसतिस्थान आणि सर्व समृद्धीनें युक्त असें जें इंद्राचें मंदिर त्यामध्यें वास करूं लागला ॥ ८ ॥ हे धर्मराजा, त्या इंद्राच्या मंदिरांत पोंवळयाच्या आणि पाचेच्या फरसबंद्या असून स्फटिक मण्याच्या भिंती होत्या व वैडूर्यमण्याचे खांब होते ॥ ९ ॥ त्यांत सर्वत्र चित्रविचित्र चांदवे लाविले असून ठिकठिकाणीं पद्मराग मण्यांचीं आसनें मांडून ठेवलेलीं होतीं आणि सभोंवार मोत्यांचे सर लोंबत असलेल्या हस्तिदंती दुधाच्या फेंसासारख्या मृदु व शुभ्र अशा शय्याहि होत्या ॥ १० ॥ हे राजा, त्या इंद्रमंदिरांत रुणझुण वाजणाऱ्या तोरड्या पायांत घालून एकमेकींना हाक मारीत संचार करणाऱ्या देवांगना रत्नांच्या फरशीमध्यें प्रतिबिंबित झालेलें आपलें सुंदर मुख अवलोकन करीत होत्या ॥ ११ ॥ तेथें सर्व इच्छित मनोरथ परिपूर्ण होत असल्यामुळें प्रसन्नचित्त होणारा, महाबलाढ्य, सर्व लोकांस पराजित करून त्रैलोक्याचें राज्य एकटाच करणारा आणि अतिशय कडक रीतीनें अंमल करणारा असा तो दैत्यराज हिरण्यकशिपु रममाण झाला व अत्यंत ताप पावलेले देवदिकहि त्याच्या पायांना अभिवंदन करूं लागले ॥ १२ ॥ हे धर्मराजा, उग्रवासाच्या

मद्यानें तो मत्त होऊन त्याचे नेत्र धुंद व आरक्त होत. तो तेज, मनःसामर्थ्य ’ शरीरसामर्थ्य आणि इंद्रियसामर्थ्य, ह्यांचें माहेरघरच जणूं असल्यामुळें ब्रह्मा, विष्णु व महेश्वर ह्या तीन देवांवांचून इतर सर्व लोकपाल हातांत नजराणे घेऊन त्याच्या सेवेला सादर होत असत ॥ १३ ॥ हे पांडुपुत्रा, स्वसामर्थ्यानें महेंद्राच्या आसनावर बसलेल्या त्या हिरण्यकशिपूच्या गुणांचे विश्वावसु, तुंबुरु आणि मी, इत्यादि सर्वजण गायन करीत असूं व गंधर्व, सिद्ध, ऋषि, विद्याधर, अप्सरा, वारंवार त्याची स्तुति करीत असत ॥ १४ ॥ वर्णाश्रमनिष्ठ लोक बहुदक्षिणायुक्त अशा यज्ञांनीं त्याचीच आराधना करूं लागले व तोहि आपल्या तेजानें त्या सर्वांचे हविर्भाग ग्रहण करूं लागला ॥ १५ ॥ त्याच्या राज्यांत सप्तद्वीपवती पृथ्वी नांगरल्यावांचून पिकूं लागली, सर्व लोक त्याचे इच्छित मनोरथ पूर्ण करूं लागले आणि अंतरिक्षलोक नाना प्रकारच्या आश्चर्यकारक वस्तु उत्पन्न करण्याचें तो एकस्थान झाला ॥ १६ ॥ त्याचप्रमाणें खारें पाणी, मद्य, घृत, उसाचा रस, दहीं, दूध आणि गोडें पाणी ह्यांचे सात समुद्र व त्यांस मिळणाऱ्या नद्या, हीं सर्व आपल्या लाटांबरोबर रत्नांच्या राशी त्याला आणून देऊं लागलीं. पर्वत आपापल्या दऱ्यांत त्याच्याकरितां क्रीडास्थानें करूं लागले. वृक्ष सर्वच ऋतूंमध्यें फलें व फुलें देऊं लागले आणि तो एकटाच वृष्टि करणें, दहन करणें, शोषण करणें इत्यादिक लोकपालांचे भिन्नभिन्न गुण धारण करूं लागला ॥ १७ ॥ ॥ १८ ॥ ह्याप्रमाणें तो दिग्विजय व निष्कंटक राजा झालेला हिरण्यकशिपु, आपल्याला प्रिय असलेल्या विषयांचा यथेच्छ उपभोग घेऊं लागला; पण तो जितेंद्रिय नसल्यामुळें त्याला तृप्ति मात्र कधीं झाली नाहीं ॥ १९ ॥ असो. ह्याप्रमाणें सनकादिकांच्या शापास पात्र झालेल्या, ऐश्वर्यानें मत्त झालेल्या आणि शास्त्रविरुद्ध वर्तन करणाऱ्या अशा त्या हिरण्यकशिपूचा बराच मोठा काळ निघून गेला ॥ २० ॥ तेव्हां उग्र दंडानें अत्यंत उद्विग्न झालेले सर्व लोक दुसरा कोणीहि रक्षक नसल्यामुळें लोकपालांसह भगवान् अच्युताला शरण गेले ॥ २१ ॥ तेथें गेल्यावर शांत आणि निर्मळचित्त असे संन्यासी लोक ज्या स्थानीं गेले असतां पुनः संसारांत माघारे येत नाहींत व ज्या स्थानीं सकलदुःखहर्ता असा परमात्मा भगवान् वास करतो, त्या स्थानाला आमचा नमस्कार असो, असें म्हणून त्यांनीं बाह्येंद्रियें व मन यांचें संयमन केलें. अंतःकरणांतील रागादि मळ काढून टाकले व बुद्धीची एकाग्रता केली आणि निद्रेचा त्याग करून व वायुभक्षण करून निर्वाह करीत ते देव त्या हृषीकेशाची स्तुति करूं लागले ॥ २२ ॥ २३ ॥ तेव्हां साधूंना अभय देणारीं व मेघासारखा गंभीर शब्दानें युक्त असल्यामुळें दशदिशांना नादित करणारी अशी वक्तृरहित आकाशवाणी उत्पन्न झाली ॥ २४ ॥ “ सुरश्रेष्ठ हो, तुम्हीं भिऊं नका ! तुम्हां सर्वांचें कल्याण असो. कारण, प्राण्यांना माझें दर्शन झालें असतां तें त्यांच्या कल्याणासच सर्वस्वीं कारण होतें ॥ २५ ॥ हे देव हो, ह्या दैत्याधमाचा दुष्टपणा मी जाणला आहे व मी त्याचा वधहि करणार आहें; परंतु तुम्ही कांहीं काळ वाट पाहा ! ॥ २६ ॥ अहो, देव, वेद, गाई, ब्राह्मण, साधु, धर्म आणि मीं यांच्या ठिकाणीं जेव्हां पुरुषाचा द्वेष उत्पन्न

होतो, तेव्हां लवकरच तो नाश पावतो ॥ २७ ॥ हे सुरश्रेष्ठा हो, वैररहित आणि अत्यंत शांत अशा आपल्या माहात्म्या प्रल्हादनामक पुत्राशीं जेव्हां हा द्रोह करूं लागेल, तेव्हां ब्रह्मदेवाच्या वरानें जरी हा प्रबळ झाला आहे तथापि मी ह्याचा वध करीन !" ॥ २८ ॥

नारद म्हणाले, —हे धर्मराजा, ह्याप्रमाणें जगद्‌गुरु परमात्म्यानें आकाशवाणीनें त्यांना सांगितलें असतां, त्याला नमस्कार करून निर्भय झालेले देव परत गेले व त्या असुराचा वध आतां झालाच असें त्यांनीं मानलें ॥ २९ ॥ हे धर्मराजा, त्या दैत्याधिपति हिरण्यकशिपूला परमप्रतापी असे चार पुत्र होते. त्यांपैकीं प्रल्हाद हा वयानें सर्वांपेक्षां लहान असून गुणांनीं मोठा होता. तो सत्पुरुषांचा उपासक, ब्राह्मणभक्त, शीलसंपन्न, सत्यवादी व जितेन्द्रिय असून आत्म्याप्रमाणें सर्व भूतांचा एकच प्रिय व हितेच्छु होता. तो दासाप्रमाणें श्रेष्ठ पुरुषांच्या चरणीं नम्र, पित्याप्रमाणें दीनावर प्रेम करणारा, आपल्या बरोबरींच्यावर भ्रात्याप्रमाणें प्रीति करणारा, गुरूंचे ठिकाणीं ईश्वरबुद्धीनें वागणारा आणि विद्या, वित्त, सौंदर्य व उत्तम जन्म ह्यांनीं युक्त असूनहि मान व गर्व ह्यांनीं रहित होता. संकटें प्राप्त झालीं असतांहि तो मनामध्यें उद्विग्न नसे. परमात्म्यावांचून इतर सर्व मिथ्या आहे असें तो समजे. ह्या लोकींच्या व परलोकींच्या विषयांविषयीं तो निःस्पृह असून इंद्रियें, प्राण, शरीर आणि बुद्धि ह्यांना त्यानें वश केलें होतें. तो असुर असतांहि असुरांच्या गुणांनीं रहित असल्यामुळें त्याच्या विषयवासना शांत झाल्या होत्या ॥ ३० ॥ ॥ ३१ ॥३२॥३३॥ हे धर्मराजा, भगवान् ईश्वराच्या ठिकाणीं असलेले गुण जसे कधीं लुप्त होत नाहींत, त्याप्रमाणें प्रल्हादाच्या ठिकाणीं असणारे ते श्रेष्ठ गुणहि अद्यापि झाकून जात नाहींत. विवेकी पुरुष वारंवार ते ग्रहण करीत असतात ॥ ३४ ॥ हे धर्मराजा, तुझ्यासारखे विष्णुभक्त त्य प्रल्हादाची प्रशंसा करतील ह्यांत आश्चर्य नाहीं; परंतु असुरांचे शत्रु जे देव तेहि सुद्धां भरसभेमध्यें खरा साधु कोण, याविषयीं गोष्टी निघाल्या असतां प्रल्हादाची उपमा देत असतात ॥ ३५ ॥ असंख्यात गुणांनीं भूषित असें त्या प्रल्हादाचें माहात्म्य असून मी तुला थोडक्यांत त्याचें केवळ दिग्दर्शन करतों. भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं त्याची स्वाभाविक प्रीति जडली होती ॥ ३६ ॥ हे राजा, तो अगदीं बालक असतांच कृष्णरूप पिशाचानें त्याचें मन घेऊन टाकलें असल्यामुळें तें त्या कृष्णाच्याच ठिकाणीं एकसारखें लागलें होतें व म्हणून सर्व खेळणीं टाकून तो सर्वदा कृष्णचिंतनच करीत असे. हें जग अशा प्रकारचें विषयासक्त आहे अशी त्याला जाणीवच नव्हती व त्यामुळें त्याची स्थिति लोकांमध्यें जडासारखी भासत होती ॥३७ ॥ बसत असतां, हिंडत असतां, भोजन करीत असतां, शयन करीत असतां, उदक प्राशन करीत, असतां किंवा भाषण करीत असतां, त्याला त्या आसनादि पदार्थांचें भानहि नसे. इतकें त्याचें गोविंदानें आपल्याशीं अगदीं एकीकरण केलें होतें ॥ ३८ ॥ एखाद्या वेळीं भगवच्चिंतनानें त्याचें अंतःकरण क्षुब्ध झालें, म्हणजे तो रोदन करीत असे. केव्हां भगवच्चिंतनानें आनंद झाला म्हणजे तो हास्य करीत असे व कधींकधीं उच्चस्वरानें भगवंताच्या गुणांचें गायन करीत असे ॥ ३९ ॥ कधीं कधीं तो मोठ्यानें हे हरे, हे प्रभो इत्यादि गर्जना

करी, तर केव्हां निर्भीड होऊन नृत्य करी आणि एखादे वेळीं ईश्वरचिंतनामध्यें गढून गेला म्हणजे तन्मय होऊन भगवंताच्या लीलांचें स्वतःच अनुकरण करी ॥ ४० ॥ केव्हां केव्हां भगवत्स्वरूपीं लीन होऊन गेल्यामुळें तो पूर्ण सुखामध्यें निमग्न होई. त्याच्या शरिरावर रोमांच उठत असत आणि स्थिर प्रेमापासून झालेल्या आनंदाश्रूंनीं भरून गेल्यामुळें त्याचे नेत्र किंचित् मिटत व तो कांहीं एक न बोलतां स्वस्थ राही ॥ ४१ ॥ याप्रमाणें अशा साधूंच्या समागमानें श्रेष्ठकीर्ति वैराग्यशील परमेश्वराच्या चरणकमलांची निरंतर सेवा त्याला प्राप्त झाल्यामुळें तो स्वतःला वारंवार परमानंदसुखाची प्राप्ति करून घेई. इतकेंच नव्हे तर दुर्जनांच्या संगामुळें दीन झालेल्या दुसऱ्या पुरुषांच्याहि मनाला शांत करीत असे ॥ ४२ ॥ असो. हे धर्मराजा, ह्याप्रमाणें महाभगवद्भक्त, महाभाग्यशाली आणि महात्मा असा जो आपला पुत्र प्रल्हाद, त्याचा हिरण्यकशिपु द्रोह करूं लागला ॥ ४३ ॥

धर्मराजा पुनः म्हणाला,–हे नारदा, शुद्ध आणि साधु असा जो आपला पुत्र प्रल्हाद त्याच्याशीं पित्यानें द्रोह केला, हे मोठें आश्चर्य असून तुजपासून तें सविस्तर ऐकावें अशी आमची इच्छा आहे ॥ ४४ ॥ पुत्र जरी प्रतिकूल असला तथापि पिते पुत्रवत्सल असल्यामुळें केवळ शिक्षा लावण्यासाठीं शब्दांनींच त्यांना ताडन करतात; परंतु शत्रूप्रमाणें त्यांच्याशीं द्रोह कधींहि करीत नाहींत ॥ ४५ ॥ तेव्हां पिता हेंच ज्याचें दैवत व जे कामक्रोधरहित असून आपणांस अनुकूल आहेत, अशा त्या प्रल्हादासारख्या पुत्राशीं पिते द्रोह कसे करितील ? यास्तव हे ब्रह्मनिष्ठ प्रभो, हिरण्यकशिपू पित्यानें स्वपुत्र प्रल्हादाचा द्वेष केला असतां, तो त्या हिरण्यकशिपूच्या मरणास कारण झाला हें मोठें आश्चर्य आहे ! तरी आमच्या या शंकेचें निराकरण करा ! ॥ ४६ ॥

**चौथा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ५ वा

नारद म्हणाला.— हे धर्मराजा, भगवान् शुक्राचार्याला असुरांनीं आपला पुरोहित केलें होतें आणि शंड आणि अमर्क नांवाचे त्याचे दोन पुत्र दैत्यराज हिरण्यकशिपूच्या गृहाजवळ राहात होते ॥ १ ॥ राजानें आपला पुत्र प्रल्हाद नीतिशास्त्रामध्यें निपुण असतांहि तो अज्ञान आहे असें समजून शंडामर्कांकडे पाठविला असतां, त्यांनीं पदविण्यास योग्य असे राजनीति आदिकरून विषय इतर असुरबालकांबरोबर त्यालाहि पढविले ॥ २ ॥ गुरुगृहीं गुरूनें जें दंडनीतिशास्त्र त्याला सांगितलें, तें प्रल्हादानें श्रवण केलें व पठणहि केलें; परंतु ' हा मी आणि हा दुसरा' अशा प्रकारचा जो मिथ्याभिमान तोच त्या नीतिशास्त्राचा आश्रय असल्यामुळें, त्याला तें मनापासून चांगलें वाटलें नाहीं ॥ ३ ॥ ह्याप्रमाणें चाललें असतां, हे पंडुपुत्रा धर्मराजा, एके दिवशीं दैत्यराज हिरण्यकशिपूनें आपल्या पुत्राला मांडीवर घेऊन 'बाळा, तुला काय चांगलें वाटतें तें सांग!' असें विचारिलें ॥४॥

प्रल्हाद म्हणाला,— हे दैत्यश्रेष्ठा, मी व माझें या मिथ्याभिमानामुळें मनांत सर्वदा अत्यंत उद्विग्न झालेल्या प्राण्यांनीं अंधकूपाप्रमाणें मोहकारक व आपल्या अधःपाताला कारण अशा गृहाचा त्याग करावा आणि वनामध्यें जाऊन श्रीहरीला भजावें हें मला चांगलें वाटतें ॥ ५ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, आपला शत्रू अशा विष्णूविषयीं अत्यंत निष्ठा-युक्त असें आपल्या पुत्राचें भाषण श्रवण करून हिरण्यकशिपूला हसू आलें आणि तो म्हणाला,—अहो, शत्रूपक्षीय लोक मुलांचा बुद्धिभेद करून टाकितात ॥ ६ ॥ तरी हे शंडामर्कहो, विविध वेष धारण करून गुप्त रीतीनें संचार करणारे विष्णुपक्षपातील ब्राह्मण ह्याचा बुद्धिभेद जेणें करून करणार नाहींत, अशा चांगल्या बंदोबस्तानें तुम्हीं आपल्या घरीं ह्या बालकाचें शिक्षण करावें ॥ ७ ॥ नंतर हिरण्यकशिपूनें त्यांच्या घरीं प्रल्हादाला पोंचविलें असतां पुरोहितांनीं त्याला हांक मारून त्याची प्रशंसा केली आणि मृदुभाषण-पूर्वक सामोपचारानें ते त्याच्याशीं बोलूं लागले ॥ ८ ॥ ते म्हणाले,—बाळा प्रल्हादा, तुझें कल्याण असो ! जें आम्हीं आतां तुला विचारणार आहों, तें तूं खरें सांग; खोटें सांगूं नको ! अरे, इतर मुलांहून अगदीं विपरीत अशी ही बुद्धि तुला कोठून उत्पन्न झाली बरें ? ॥ ९ ॥ हे कुलनन्दना प्रल्हादा, दुसऱ्यांनीं तुझ्या बुद्धीचा भेद केला, कीं आपोआपच तो झाला ? आम्ही तुझे गुरु असून हें समजून घेण्याची आमची इच्छा आहे. तरी हा प्रकार तूं आम्हांला सांग ! ॥ १० ॥

प्रल्हाद म्हणाला,—' मी व दुसरा ' असा मिथ्या अभिमान ज्याच्या मायेनें केलेला असून त्या मायेनें बुद्धीला मोह पडलेल्या तुम्हांसारख्या पुरुषांच्या ठिकाणींच

जो दृष्टीस पडतो; त्या भगवंतालाच नमस्कार असो ॥ ११ ॥ तो भगवान् जेव्हां पुरुषांना अनुकूळ होतो, तेव्हां ' हा वेगळा व मी वेगळा ' अशी मिथ्या संसारविषयक अविवेकी बुद्धि नष्ट होते ॥ १२ ॥ वास्तविक पाहूं गेलें असतां, ह्या परमात्म्याचेंच अविवेकी लोक ' हा मी आहे व परकी आहे असें निरूपण करतात. त्या परमात्म्याची लीला दुर्घट असून त्याला जाणण्याच्या कामीं ब्रह्मादिक वेदवादीसुद्धां वेडे होऊन जातात. तो हा परमात्माच माझ्या बुद्धीचा भेद करीत आहे ॥ १३ ॥ अहो गुरुजी, ज्याप्रमाणें लोहचुंबकाजवळ लोखंड आपण होऊनच भ्रमण करूं लागतें, त्याप्रमाणें चक्रपाणी श्रीहरीच्या समीप माझें चित्त दैवयोगानें जाऊन तेथें त्याला बुद्धिभेद होतो ॥ १४ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, त्या ब्राह्मणाला असें बोलून तो महाबुद्धिवान् प्रल्हाद स्तब्ध राहिला असतां तो अविवेकी राजसेवक ब्राह्मण क्रुद्ध झाला व त्याची निर्भर्त्सना करून म्हणाला, ॥ १५ ॥ अरे ! हा आम्हांला अपयश देणारा पोर आहे, ह्यास्तव एक छडी आणा ! ह्या दुर्बुद्धि कुलांगाराला सामदामादि चार उपायांमधील चौथा उपाय जो दंड तोच योग्य आहे ॥ १६ ॥ अहो, काय सांगावें ! दैत्यरूप चंदनवृक्षाच्या वनांत हा वटवृक्षच उपजला असून दैत्यरूप चंदनवृक्षाचीं मुळें तोडून टाकण्यास तयार असलेल्या विष्णुरूप कुऱ्हाडीचा हा पोरटा म्हणजे दांडाच झाला आहे ॥ १७ ॥ असो. ह्याप्रमाणें दरडावणीसारख्या नाना प्रकारच्या उपायांनीं त्या प्रल्हादास भय दाखवून त्या ब्राह्मणानें त्याला धर्म, अर्थ व काम ह्यांचें प्रतिपादन करणारें शास्त्र पढविलें ॥ १८ ॥ नंतर शिकण्यास योग्य असे जे सामदामादिक चार उपाय ते ह्याला समजले असें जाणून गुरूनें त्यास मातेकडून अभ्यंगस्नान घालविलें आणि तिलकादिकांनीं अलंकृत करून ते त्याला हिरण्यकशिपूकडे दाखवावयास घेऊन गेले ॥ १९ ॥ तेथें प्रल्हाद पित्याच्या पायां पडला असतां हिरण्यकशिपूनें त्याला आशीर्वाद दिला आणि त्याचें अभिनंदन करून बाहूंनीं पुष्कळ वेळपर्यंत त्याला आलिंगन दिलें. त्या असुरश्रेष्ठ हिरण्यकशिपूला पुत्राला पाहून परमानंद झाला ॥ २० ॥ हे युधिष्ठिरा, प्रसन्नमुख अशा त्या पुत्राला हिरण्यकशिपूनें अंकावर घेऊन त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें आणि प्रेमाच्या अश्रुबिंदूंनीं त्याला सिंचन करीत तो त्याच्याशीं बोलूं लागला ॥ २१ ॥

हिरण्यकशिपु म्हणाला,—बाळा प्रल्हादा, तुला दीर्घायुष्य असो ! तो पुढें म्हणाला, बाळा प्रल्हादा, ह्या वेळपर्यंत गुरूपासून जें तूं शिकलास त्यापैकीं तुला चांगलें येत असेल तें तूं म्हण पाहूं ! ॥ २२ ॥

प्रल्हाद म्हणाला,—" हे ताता, विष्णूचें कीर्तन, श्रवण, स्मरण, पादसेवन, पूजन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मसमर्पण ह्या नऊ लक्षणांनीं युक्त अशी भगवान् विष्णूच्या ठिकाणीं पुरुषानें अर्पण केलेली भक्ति ज्याच्यायोगानें साक्षात् उत्पन्न होते, तेंच अध्ययन असें मी समजतों " ॥ २३ ॥ २४ ॥ हें पुत्राचें भाषण श्रवण करून क्रोधानें हिरण्यकशिपूचे ओंठ स्फुरण पावूं लागले आणि तो गुरुपुत्राला म्हणाला, ॥ २५ ॥

हे अधम ब्राह्मणा, हें तूं काय केलेंस ? हे दुर्मते, माझ्या प्रतिपक्षाचा आश्रय करणाऱ्या तूं दुष्टानें मला न जुमानितां ज्याच्यामध्यें कांहीं अर्थ नाहीं, असें कांहीं तरी ह्याला शिकविलें आहेस ।। २६ ।। असो. मित्रत्वानें वागत असूनहि तुझें आचरण आमच्या विरुद्ध झालें, हें कांहीं मोठें असंभवनीय नाहीं. कारण ज्यांची मैत्री कपटयुक्त असते असे तुमच्यासारखे कपटवेष धारण करून संचार करणारे दुर्जन ह्या लोकामध्यें आहेतच; पण जसा पातकी लोकांना नरकभोगानंतर सुद्धां रोगाचा उद्भव होतो, तसा वरकरणीं सज्जनाप्रमाणें वागणाऱ्या त्या दुर्जनांच्या अंतर्यामीं असलेला द्वेषहि कालांतरानें दृष्टोत्पत्तीस येतो ।।२७।।

गुरुपुत्र म्हणाला,—हे इंद्रशत्रो, हा तुझा पुत्र जें सांगत आहे, तें त्याला मी पढविलें नाहीं व दुसऱ्याहि कोणीं पढविलें नाहीं. तर ही ह्याची स्वाभाविक उपजत बुद्धि आहे. तरी हे राजा, आपला क्रोध आवरून धर! आमच्यावर भलताच दोषारोप करूं नकोस ! ।। २८ ।।

नारद म्हणाला,——हे धर्मराजा, ह्याप्रमाणें गुरूनें प्रत्युत्तर दिलें असतां तो असुर हिरण्यकशिपु, पुनः आपल्या पुत्राला म्हणाला,– " हे अभद्रा, गुरूपासून जर ही दुष्टबुद्धि तुला प्राप्त झाली नाहीं, तर ती कोठून प्राप्त झाली ? " ।। २९ ।। हें पित्याचें भाषण ऐकून प्रल्हादानें उत्तर दिलें, 'ज्यांची गृहसौख्याविषयींच निरंतर चिंता चाललेली असते, इंद्रियांच्या योगानें जे संसारामध्यें प्रवेश करून वारंवार विषयांचें सेवन करीत असतात, अशा पुरुषांची बुद्धि दुसऱ्यांच्या उपदेशानें आपण होऊन अथवा परस्परांच्या संभाषणानेंहि श्रीकृष्णाच्या ठिकाणीं आसक्त होत नाहीं ।। ३० ।। ज्यांच्या अंतःकरणांत विषयवासना भरलेश आहेत व जे बाह्य विषयांनाच पुरुषार्थ मानतात, त्यांस स्वस्वरूपांतच पुरुषार्थ आहे असें मानणाऱ्याचें उद्दिष्टस्थान जो विष्णु, त्याला ते जाणत नाहींत. बाह्य विषयांच्या ठिकाणीं परमार्थबुद्धि धारण करणाऱ्यांनाच गुरु असें समजण्याचा त्यांचा स्वभाव असल्यामुळें, जसे आंधळ्यांच्या मागून जाणारे आंधळे, मार्ग न जाणतां खड्ड्यामध्यें पडतात, त्याप्रमाणें ईश्वराच्या वेदवाणीरूप दावणींत ते काम्यकर्माच्या योगानें बद्ध होतात ।। ३१ ।। हे तात, ज्यांचा विषयसंबंधीं अभिमान अगदीं नष्ट झाला आहे, त्या अत्यंत पूज्य पुरुषांच्या चरणरजांनीं स्नान करण्याची आवड जोंपर्यंत ह्यांनीं धरिली नाहीं, तोंपर्यंत श्रुतिवचनांनीं उत्पन्न झालेली ह्यांची बुद्धि देखील भगवंताच्या चरणीं रत होत नाहीं ।। ३२ ।। इतकें बोलून प्रल्हाद स्वस्थ बसला असतां विवेकशून्य अंतःकरणाच्या त्या हिरण्यकशिपूनें क्रोधामुळें त्याला आपल्या मांडीवरून भूमीवर लोटून दिलें ।। ३३ ।। असहिष्णुता व क्रोध ह्यांनीं व्याप्त झाल्यामुळें त्याचे नेत्र आरक्त झाले व तो म्हणाला,–' हे राक्षस हो, ह्याला येथून लवकर बाहेर काढा आणि ह्याचा वध करा ! हा वधासच योग्य आहे ।। ३४ ।। हे राक्षसहो, मित्रांना टाकून हा अधमपुत्र ज्या अर्थी चुलत्याचा घात करणाऱ्या अशा विष्णूच्या चरणांचें एखाद्या दासाप्रमाणें पूजन करतो, त्या अर्थी माझ्या भ्रात्याचा घात करणारा विष्णु तो हाच आहे ।। ३५ ।। अहो ! ज्यानें पांच वर्षांचा असतांनाच त्याग करण्यास कठीण अशा मातापितरांविषयींच्या स्नेहाचा त्याग केला, तो

हा कृतघ्न, विष्णूचें तरी काय हित करणार आहे ? ॥ ३६ ॥ हे राक्षस हो, जसें औषध परिणामीं हितकारक असतें त्याप्रमाणें एखादा परकीसुद्धां जर आपला हितकारक असेल तर तो आपलें अपत्यच समजला पाहिजे आणि औरसपुत्र जर आपलें अहित करणारा असेल, तर त्याला रोगाप्रमाणें आपला शत्रु समजलें पाहिजे. फार काय, आपल्या शरिराचा एखादा अवयव जर आपलें हित करणारा नसेल तर तो तोडून टाकावा. कारण, तेवढ्याचा त्याग केला असतां बाकीचें शरीर सुखानें वांचतें ॥ ३७ ॥ यास्तव भोजन, शयन, आसन इत्यादि ठिकाणीं विषप्रयोग वगैरे उपाय करून तुम्ही ह्याचा वध करा ! कारण, विषयासक्त झालेलें इंद्रिय जसें मुनीला शत्रुवत् असतें, त्याप्रमाणें पुत्रवेष धारण करणारा हा पोरहि माझा शत्रुच आहे !' ॥ ३८ ॥ हिरण्यकशिपूची अशी आज्ञा होतांच तीक्ष्ण दाढांचे, भयंकर मुखांचे आणि लाल केंस व दाढीमिशा असलेले असे ते राक्षस हातांमध्ये शूळ घेऊन भयंकर गर्जना करीत 'तोडा ! मारा !' असें म्हणत स्वस्थ बसलेल्या त्या प्रल्हादाच्या मर्मस्थानीं प्रहार करूं लागले ॥ ३९ ॥ ॥ ४० ॥ परंतु दैवहीन पुरुषाचे जसे मोठमोठेहि उद्योग व्यर्थ जातात, त्याप्रमाणें प्रल्हादाच्या शरिरावर त्या राक्षसांनीं केलेले प्रहार निष्फळ झाले. कारण त्यानें आपलें मन निर्विकार, निर्विषय, निरतिशय ऐश्वर्यांनीं युक्त आणि शस्त्रादिकांचाहि नियंता' अशा परमेश्वराच्या ठिकाणीं लाविलें होतें ॥ ४१ ॥ हे युधिष्ठिरा, ह्याप्रमाणें त्या प्रल्हादाला मारण्याविषयींचा प्रयत्न निष्फळ झाला असतां हिरण्यकशिपूला फारच भीति उत्पन्न झाली व त्यानें अत्यंत आग्रहपूर्वक त्याच्या वधाविषयीं आणखी उपाय योजले ॥ ४२ ॥ त्यानें त्याला दिग्गजांच्या पायांखालीं तुडविलें, मोठमोठ्या सर्पांकडून दंश करविले, त्याच्या मागें कृत्या लाविली, पर्वतशिखरांवरून त्याला खालीं लोटून दिलें. नाना प्रकारच्या मार्गांनीं त्याचा घात करण्याचा प्रयत्न केला. खड्डयामध्यें घालून त्याला पुरलें, विषप्रयोग केला, उपाशीं ठेविलें, कडक थंडीवाऱ्यामध्यें व अग्नीमध्यें टाकलें व पाण्यामध्यें बुडविलें आणि त्याच्या अंगावर पर्वतहि फेंकले; पण या सर्वहि उपायांनीं जेव्हां त्या निष्पाप पुत्राला मारण्यास तो असुर समर्थ झाला नाहीं व त्याचा वध करण्यास जेव्हां त्याला आणखी कांहींच उपाय सुचेनासा झाला, तेव्हां तो अत्यंत चिंताग्रस्त होऊन मनामध्यें म्हणाला, ॥ ४३ ॥ ४४ ॥ अहो, मी ह्याला पुष्कळ कटुशब्दांनीं पुष्कळ टाकून बोललों व नाना प्रकारें त्याचा द्रोह करून अभिचारादि निंद्य कर्मांनीं त्याचा वध करण्याचा यत्न केला; परंतु त्यांपासूनहि हा आपल्याच सामर्थ्यानें मुक्त झाला ॥ ४५ ॥ हा बालक असून अगदीं माझ्या समीप असतांहि ह्याच्या चित्ताला माझी मुळींच भीति वाटत नाहीं. तेव्हां शुनःशेपाप्रमाणें हाहि माझें शत्रुत्व विसरणार नाहीं * ॥ ४६ ॥ ह्याचा प्रभाव अपरिमित असल्यामुळें ह्याला कोणापासूनहि भय नाहीं. हा अमर आहे. यास्तव

---

* शुनःशेप हा अजीगर्त ब्राह्मणाचा मधला मुलगा. त्याला आईबापांनीं विकलें व हरिश्चंद्राच्या यज्ञांत त्याचा बळी म्हणून वध करावयासहि त्याचा बाप तयार झाला.

ह्याच्याच विरोधामुळें निःसंशय मला मृत्यु प्राप्त होईल; नाहीं तर मुळींच प्राप्त होणार नाहीं ॥ ४७ ॥ असो. अशा प्रकारच्या चिंतेनें हिरण्यकशिपु किंचित् निस्तेज होऊन तो शून्यांतःकरणानें खालीं मान घालून बसला असतां शुक्राचार्यांचे पुत्र शंडामर्क त्याजजवळ आले आणि म्हणाले, ॥ ४८ ॥ हे प्रभो, भ्रुकुटींच्या चलनानें ज्यांतील सर्व लोकपाल भयभीत झाले आहेत असें हें त्रैलोक्य ज्या अर्थी तूं एकट्यानें जिंकलें आहेस, त्या अर्थी तुला चिंतास्पद असें आम्हांला कांहींच दिसत नाहीं. आतां, प्रल्हादाचा शत्रुपक्षपात आणि प्रभाव पाहून चिंता किंवा निर्भयपणा मानण्याचें मुळींच कारण नाहीं ॥ ४९ ॥ तथापि हे असुरश्रेष्ठा, शुक्राचार्य गुरु तपश्चर्या पुरी करून माघारे येईपर्यंत, हा प्रल्हाद भयभीत होऊन पळून न जाईल अशा रीतीनें तूं याला वरुणपाशांनीं बद्ध करून ठेव ! कारण, वय जाईल त्या मानानें थोर पुरुषाची बुद्धि बदलून चांगली होते ॥ ५० ॥ ह्याप्रमाणें गुरुपुत्रानें दिलेल्या मसलतीचा 'ठीक आहे.' असें म्हणून अंगीकार करून हिरण्यकशिपु त्याला म्हणाला,–' गुरुपुत्र हो , गृहस्थाश्रमी राजांचे जे धर्म आहेत तेच तुम्हीं आतां ह्याला शिकवावे ॥ ५१ ॥ हे धर्मराजा, नंतर त्या शंडामर्कांनीं विनययुक्त आणि नम्र अशा प्रल्हादाला अनुक्रमानें धर्म, अर्थ व काम हेच पुरुषार्थ निरंतर पढविले ॥ ५२ ॥ परंतु गुरूंनीं आपल्याला यथासांग शिकविलेले जे धर्म व काम ते त्याला चांगले वाटले नाहींत. कारण, हें शिक्षण रागद्वेषादि द्वंद्वांमुळें विषयांवर आसक्त होणाऱ्या पुरुषांनीं मात्र चांगले म्हणून वर्णिले आहेत ॥ ५३ ॥ असो. एका वेळीं तो गुरु कांहीं गृहकर्मासाठीं दूर गेला असतां, मुलांना खेळण्याची संधि सांपडली. त्या वेळीं समवयस्क मुलांनीं त्या प्रल्हादाला खेळण्याकरितां हांक मारली ॥ ५४ ॥ तेव्हां त्यांची स्थिति ओळखून त्या महाज्ञानी प्रल्हादानें मधुर वाणीनें त्यांनाच आपल्या जवळ बोलाविलें आणि हंसतहंसत प्रेमानें तो त्यांच्याशीं बोलूं लागला ॥ ५५ ॥ धर्मराजा, ते बालक असल्यामुळें रागद्वेषादि द्वंद्वांनी विषयासक्त झालेल्या पुरुषांच्या उपदेशांनीं व आचारणांनीं त्यांची बुद्धि दूषित झाली नव्हती. प्रल्हादाविषयीं त्यांना आदर वाटत असे व त्यामुळें त्याचें भाषण ऐकतांच त्या सर्वांनीं आपल्या खेळण्याचा त्याग केला व आपलें अंतःकरण आणि दृष्टि त्याच्याकडे लावून ते त्याच्या सभोंवतीं बसले आणि दयाळू व हितकारी अशा त्या महाभगवद्भक्त असुर प्रल्हादानें त्यांना उपदेश केला ॥ ५६ ॥ ५७ ॥

---

हें पाहून शुनःशेपानें देवाची स्तुति केली व आपली सुटका करून घेतली. नंतर त्यानें आईबापांचा त्याग करून विश्वामित्राचा आश्रय केला व त्याचा तो पुत्र झाला. अशी कथा ऐतरेय ब्राह्मणांत व पुढें भागवतांतहि आली आहे.

**पांचवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६ वा

प्रल्हाद म्हणाला,—– हे मित्र हो, ज्ञानी पुरुषानें ह्या मनुष्यजन्मामध्येंच व त्यांतूनहि अगदीं कौमारावस्थेमध्येंच भागवतधर्माचें आचरण करावें; सकामधर्माचें आचरण करूं नये. कारण हा मनुष्यजन्मच दुर्लभ असून पुरुषार्थप्रद आहे; पण तो अशाश्वत आहे ॥ १ ॥ मनुष्यजन्मामध्यें विष्णूच्या शरण जावें हेंच पुरुषाला योग्य आहे. कारण, हा विष्णुच सर्व भूतांचा आत्मा, ईश्वर, प्रिय आणि हितकारी आहे ॥ २ ॥ हे दैत्य हो, जसें प्राण्यांना आयास न करितां पूर्वकर्मानेंच दुःख प्राप्त होतें, त्याप्रमाणें देहाच्या योगानें इंद्रियांसंबंधीं सुखहि सर्व योनींमध्यें दैवयोगानेंच प्राप्त होतें ॥ ३ ॥ म्हणून त्याच्याकरितां प्रयत्न करूं नये. तसा प्रयत्न केल्यानें केवळ आयुष्याचा व्यय मात्र होतो. शिवाय मुकुंदाच्या चरणकमलाची सेवा करणारा पुरुष जसें परमानन्दरूप क्षेम पावतो, तसें क्षेम विषयसुखार्थ प्रयत्न करणारा पुरुष पावत नाहीं ॥ ४ ॥ ह्यास्तव संसारामध्यें सांपडलेल्या विवेकी पुरुषानें जोंपर्यंत सर्वांगांनीं परिपूर्ण असलेल्या आपल्या शरिराचा नाश झाला नाहीं, तोंपर्यंत लवकरच आत्मकल्याणाकरितां प्रयत्न करावा ॥ ५ ॥ अहो, पुरुषांचें आयुष्य आधीं मुळीं शंभर वर्षें; त्यांतील अर्धें आयुष्य अज्ञानांत इंद्रियनिग्रह न केल्यामुळें व्यर्थ जातें. कारण, तो पुरुष, विषयरूपी अज्ञानामध्यें निमग्न होऊन घोरत पडतो ॥ ६ ॥ तसेंच बाल्यावस्थेमध्यें अज्ञानी असल्यामुळें दहा वर्षें व कौमारावस्थेमध्यें खेळत असल्यामुळें दहा वर्षें मिळून वीस वर्षें आणि वृद्धावस्थेमध्यें जरेनें शरीर ग्रस्त होऊन अशक्त झाल्यामुळें वीस वर्षें असें आणखी आयुष्य फुकटच जातें ॥ ७ ॥ बाकीचें आयुष्य प्रबळ मोहानें व दुःखांनीं चोहोंकडून परिपूर्ण अशा कामाच्या योगानें गृहामध्यें आसक्त झालेल्या त्या प्रमत्त पुरुषाच्या बाबतींत व्यर्थच जातें ॥ ८ ॥ तात्पर्य, हे दैत्य हो. इंद्रियदमन न केलेला असा कोणता बरें पुरुष गृहामध्यें आसक्त झालेल्या व स्नेहरूप दृढपाशांनीं बद्ध झालेल्या आपल्या स्वतःची सुटका करण्यास समर्थ होईल ? ॥ ९ ॥ जें द्रव्य, चोर, सेवक आणि वाणी हे आपले अतिप्रिय असे प्राण खर्चून सुद्धां मिळवूं पाहातात, त्या प्राणांपेक्षांहि प्रिय असलेल्या द्रव्याची इच्छा कोणता पुरुष बरें सोडून देईल ? ॥ १० ॥ जसा कोश करणारा कीटक आपणाला हितकारक असें घर निर्माण करीत असतां, शेवटीं आपणांस त्यांतून बाहेर पडण्यासहि मार्ग ठेवीत नाहीं, त्याप्रमाणें विषयांची इच्छा तृप्त न झाल्यामुळें लोभानें स्वतःच्या बंधास कारण होणारीं कर्में जो करणारा पुरुष, स्त्रीपुत्रांवर अनुरक्तचित्त होऊन त्यांच्या स्नेहपाशानें बद्ध होतो, तो दयायुक्त अशा प्रिय भार्येचा एकान्तस्थळीं घडलेला प्रसंग, तिच्याबरोबर झालेलीं मनोहर भाषणें, मित्रांची संगती, मधुर शब्द उच्चारणारीं मुलें, सासरीं असलेल्या त्या मनोहर कन्या, भ्राते, भगिनी, वृद्धावस्थेमुळें दीन झालेले मातापितर, सुंदर आणि विपुल साहित्यांनीं भरलेलीं घरें, कुलपरंपरेनें

आलेल्या वृत्ति, पशुसमुदाय आणि भृत्यगण ह्यांचें स्मरण करणारा त्यांचा त्याग करण्यास कसा बरें समर्थ होईल? मित्र हो, जो शिश्न आणि जिव्हा ह्यांपासून होणारें सुखच अधिक मानितो व ज्याला अत्यंत मोह प्राप्त झाला आहे,तो कसा बरें विरक्त होईल? ॥ ११ ॥ १२-॥ १३ ॥ हे असुरबालकहो, संसारी पुरुष प्रमत्त होऊन कुटुंबाच्या पोषणार्थ आपल्या आयुष्याचा क्षय होत आहे व आपण पुरुषार्थाला मुकत आहों, हें जाणत नाहीं व सर्व काळीं आणि सर्व ठिकाणीं तापत्रयानें दुःख पावत असूनहि कुटुंबामध्येंच रममाण होत असतो; त्याला त्या कुटुंबामध्यें दुःख आहे असें वाटतच नाहीं ॥ १४ ॥ अहो, फार काय, परंतु ज्याचें चित्त द्रव्याच्या ठिकाणीं संलग्न झालेलें असतें, अशा त्या परवित्त हरण करणाऱ्या कुटुंबी पुरुषाला परलोकीं नरकरूप व इहलोकीं राजदंडादिरूप दुःख भोगावें लागतें, हें जाणत असूनहि, तो जितेन्द्रिय नसल्यामुळें व द्रव्याभिलाषाची त्याची शांति झाली नसल्यामुळें तो परवित्त हरण करतोच ॥ १५ ॥ हे दानवहो, ह्याप्रमाणें केवळ कुटुंबपोषण करणारा पुरुष विद्वान् असला तरी, आत्मज्ञान मिळविण्याला समर्थ होतो असें नाहीं. अत्यंत मूढ मनुष्याप्रमाणें तोसुद्धां अज्ञानांत पडतो. कारण, 'हें माझें व हें दुसऱ्याचें' असा भिन्न भाव त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला असतो ॥ १६ ॥ हे दैत्यपुत्र हो, ज्याच्या नेत्रकटाक्षामध्यें कामेच्छा आहे, ज्याचा संबंध घडल्यानें शृंखले-प्रमाणें बंधास कारण अशी पुत्रपौत्रादि संतति प्राप्त होते, त्या स्त्रियांचा, त्यांच्याबरोबर क्रीडा करण्याकरितां ठेवलेला जणू वानरच, असा कोणताहि विषयलंपट पुरुष ज्या अर्थी कोणत्याहि ठिकाणीं व कोणत्याहि काळीं आपली स्वतःची सुटका करून घेण्यास समर्थ होत नाहीं, त्या अर्थी तुम्ही विषयांच्याच ठिकाणीं आसक्त असणाऱ्या दैत्यांचा संग सोडून द्या व आदिदेव जो नारायण त्याला सत्वर शरण जा! कारण, सर्वसंगपरित्याग केलेले विवेकी पुरुष मोक्ष म्हणून त्याचाच स्वीकार करतात ॥ १७ ॥ १८ ॥ हे दैत्यपुत्र हो, भगवान् अच्युत हा भूतमात्रांचा आत्मा असून सर्व ब्रह्मांड व्यापून असल्यामुळें त्याला प्रसन्न करून घेण्यास पुरुषाला फारसा प्रयास पडत नाहीं ॥ १९ ॥ वृक्षपाषाणादिकां-पासून तों ब्रह्मदेवापर्यंत ल्हानथोर जीवमात्रांमध्यें, पंचमहाभूतांपासून झालेल्या अचेतन अशा घटपटादि पदार्थांमध्यें, आकाशादि पंचमहाभूतांमध्यें व सत्त्वादिगुणांमध्यें, मायेमध्यें व गुणांचे विकार अशा महत्तत्त्वादिकांमध्येंहि ब्रह्मस्वरूप, सर्वांतर्यामी, अचिन्त्य, ऐश्वर्यांनीं युक्त व अपक्षयादि विकारानें रहित, असा एकच ईश्वर भासत आहे ॥२०॥२१॥ हे मित्र हो, केवळ अनुभवात्मक आनंदस्वरूपी असा तो ईश्वर, स्वतः भेदरहित व निर्देश करण्यास अशक्य असूनहि अन्तर्यामीं द्रष्ट्याच्या स्वरूपानें व्यापक व भोग्य अशा देहादि स्वरूपानें व्याप्य म्हणून जाणला जातो. तथापि त्यानें गुणमय सृष्टि उत्पन्न करणाऱ्या मायेच्या योगानें आपलें ऐश्वर्य आच्छादित करून टाकलें आहे; म्हणून तो सर्वत्र असतांहि त्याचे सर्वज्ञत्वादि गुण सर्व ठिकाणीं उपलब्ध होत नाहींत ॥ २२ ॥ २३ ॥ यास्तव तुम्हीं असुरस्वभावाचा त्याग करून सर्व भूतांविषयीं दया आणि मैत्री धारण करा. कारण तिच्या योगानें अधोक्षज भगवान् संतुष्ट होतो ॥ २४ ॥

तो आदिपुरुष अनंत भगवान् संतुष्ट झाला असतां काय बरें दुर्लभ आहे? आणि मग गुणांचा परिणाम करणारें जें दैव, ज्याच्या योगें ह्या लोकीं आपोआप सिद्ध होणारे जे धर्मादि पुरुषार्थ, ते आचरण करून तरी वास्तविक काय लाभ? तसेंच भगवच्चरणाच्या सान्निध्यांत राहून त्याच्या माहात्म्याचें गायन करून त्यांतील सार सेवन करणाऱ्या आम्हांला मोक्षाची इच्छा करून तरी काय करावयाचें आहे? ॥ २५ ॥ हे असुर हो, धर्म, अर्थ व काम म्हणून जो तीन प्रकारचा पुरुषार्थ सांगितला आहे व ज्याकरितां आत्मविद्या, कर्मविद्या, दंडनीति, तर्कशास्त्र इत्यादि नाना प्रकारचीं जीं उपजीविकासाधनें दाखविलीं आहेत, तीं सर्व वेदामध्यें सांगितलीं आहेत; परंतु अंतर्यामीं परमपुरुष भगवंतास स्वात्मनिवेदन करणें, हेंच एक सत्य असें मी मानतों ॥ २६ ॥ हे दैत्यपुत्र हो, निर्मल व दुर्लभ असें हें ज्ञान ऋषीचा नरसखा जो नारायण, त्यानें नारदाला सांगितलें होतें. ज्यांनीं सर्वसंगपरित्याग केला आहे, ज्यांस भगवंताच्या चरणकमलांच्या रजःकणांचें स्नान घडलें आहे, अशा एकनिष्ठ भक्तांनाच तें ज्ञान अवश्य प्राप्त होतें. उत्तम पुरुषांनाच होतें असें नाहीं ॥ २७ ॥ मी हें सानुभव ज्ञान व शुद्ध असा भागवतधर्म अशीं दोन्ही भगवंताचें नित्य दर्शन घेणाऱ्या नारदापासून श्रवण केलीं आहेत ॥ २८ ॥

दैत्यपुत्र म्हणाले,— हे प्रल्हादा, ह्या गुरुपुत्रावांचून तुला व आम्हांला दुसरा गुरु मुळींच माहीत नाहीं. आपण अगदीं लहान होतों तेव्हांपासून हेच आपले गुरु आहेत ॥ २९ ॥ अंतःपुरामध्यें असलेल्या बालकाला तर नारदासारख्या महात्म्याची भेट होणें दुर्घट आहे. यास्तव हे प्रियमित्रा प्रल्हादा, याविषयीं तुझ्या वचनावर आमचा विश्वास बसण्यासारखी जर कांहीं गोष्ट असेल तर ती सांगून तूं आमचा संशय दूर कर! ॥ ३० ॥

**सहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७ वा

नारद म्हणाला,--हे धर्मराजा, ह्याप्रमाणें महाभगवद्भक्त प्रल्हादाला दैत्य-पुत्रांनीं प्रश्न केला असतां, तो काय सांगतो याविषयीं जिज्ञासा उत्पन्न झालेल्या दैत्य-पुत्रांना माझ्या उपदेशाचें स्मरण करीत तो प्रल्हाद उत्तर देऊं लागला ॥ १ ॥

प्रल्हाद म्हणाला,–दैत्यपुत्र हो, आमचा पिता हिरण्यकशिपु तप करण्याकरितां मंदरपर्वतावर गेला असतां जसा मुंग्यांनीं सर्पाचा देह भक्षण करावा त्याप्रमाणें त्याचाहि देह भक्षण केला. तेव्हां लोकांना अतिशय ताप देणाऱ्या ह्या प्राण्याला त्याच्या पापानेंच भक्षण केलें हें फार चांगलें झालें, असें हर्षपूर्वक बोलून इंद्रादि देवांनीं दानवांबरोबर युद्ध करण्याकरितां मोठा उद्योग आरंभिला ॥ २ ॥ ॥ ३ ॥ तो त्यांचा अतिपराक्रमाचा उद्योग पाहून असुरांचे सर्व सेनापति भयभीत झाले आणि देव त्यांचा वध करूं लागले असतां आपल्या स्त्रिया, पुत्र, मित्र, आप्त, गृहें, पशु आणि भोगसाधनभूत पदार्थ ह्यांच्याकडे लक्ष न देतां त्यांचा त्याग करून, ते आपल्या प्राणांचें रक्षण करण्याकरितां दशदिशांकडे पळून गेले ॥ ४ ॥ ५ ॥ त्या वेळीं विजयेच्छु देवांनीं राजवाडा लुटून त्यांतील सर्व द्रव्यांचा अपहार केला. इंद्र तर राजाची पट्टराणी व माझी माता जी कयाधू, तिला पकडून घेऊन चालला ॥ ६ ॥ तेव्हां ती मार्गामध्यें टिटवी पक्षिणीप्रमाणें भयानें उद्विग्न होऊन रोदन करूं लागली. तेव्हा अकस्मात् तेथें आलेल्या नारदानें तिला पाहून इंद्राला सांगितलें कीं, 'हे देवेन्द्रा, ह्या निरपराधी स्त्रीला घेऊन जाणें हें तुला योग्य नाहीं ! हे भाग्यवंता, तूं हिला सोडून दे ! कारण, ही परस्त्री असून पतिव्रता आहे ॥ ७ ॥ ॥ ८ ॥

इंद्र म्हणाला,--हे देवर्षे, हिच्या गर्भामध्यें देवद्वेषी हिरण्यकशिपूचें, सहन करण्यास दुर्धर असें वीर्य गर्भरूपानें वाढत आहे, ह्यास्तव ही प्रसूत होईपर्यंत हिला येथें असूं दे ! नंतर तिला होणाऱ्या पुत्राचा वध करून माझें कार्य झाल्यावर मी हिला सोडून देईन ! ॥ ९ ॥

नारद म्हणाला,--हे इंद्रा, हा हिचा गर्भ साक्षात् भगवान् अनंताचा सेवक, बलाढ्य, निर्दोष, केवळ आपल्या गुणांनींच मोठा झालेला आणि महाभगवद्भक्त असल्या-मुळें तुझ्या हातून मरण पावणार नाहीं ! ॥ १० ॥ इंद्रानें नारदाच्या त्या वचनाला मान देऊन तिला सोडून दिलें आणि तिच्या पोटीं असणारा भगवद्भक्त जो मी त्या माझ्या-विषयींच्या भक्तीमुळें तिला प्रदक्षिणा करून तो स्वर्गी गेला ॥ ११ ॥ नंतर तो देवर्षि माझ्या मातेला आश्रमास घेऊन गेला आणि तिला आश्वासन देऊन, ' मुली, तुझा भर्ता तपश्चर्या करून माघारा येईपर्यंत तूं ह्या आश्रमामध्यें खुशाल राहा ! ' असें तिला म्हणाला ॥ १२ ॥ तेव्हां तिनेंहि ' ठीक आहे ! ' असें म्हटलें व दैत्याधिपति हिरण्यकशिपु आपलें घोर तप संपवून परत येईपर्यंत ती नारदाच्या आश्रमांत निर्भयपणें राहिली ॥ १३ ॥

मग त्या गर्भिणी पतिव्रतेनें आपली प्रसूति इच्छित वेळीं व्हावी व तोंपर्यंत आपल्या गर्भाचें संरक्षण व्हावें, यासाठीं मोठ्या भक्तीनें त्या आश्रमामध्यें नारदऋषींची सेवा केली ॥ १४ ॥ तेव्हां त्या दयाळू समर्थ ऋषीनें तिच्या शोकाची निवृत्ति व्हावी आणि मलाहि समजावें अशा उद्देशानें धर्माचें भक्तिरूप तत्त्व व आत्मानात्मविवेकरूप निर्मळ ज्ञान ह्या दोहोंचा तिला उपदेश केला ॥ १५ ॥ परंतु पुष्कळ काळ लोटल्यामुळें व जात्या स्त्री असल्यामुळें, माझी माता तें ज्ञान विसरून गेली; परंतु मजवर ऋषीचा अनुग्रह असल्यामुळें, अद्यापिसुद्धां मला त्याची विस्मृति पडत नाहीं ॥ १६ ॥ आतां तुम्ही जर माझ्या भाषणावर विश्वास ठेवाल, तर तुम्हांलासुद्धां तीं दोन्ही प्राप्त होतील. कारण, श्रद्धेमुळें जशी मला अहंकाराचा नाश करणारी निपुण बुद्धि प्राप्त झाली, तशीच स्त्रिया व मुलें ह्यांनांहि ती प्राप्त होते ॥१७॥ हे मित्र हो, नाना प्रकारें विकार उत्पन्न करण्यास समर्थ अशा कालाच्या योगानें वृक्षाच्या फळांत जसें उत्पन्न होणें, असणें, वाढणें, परिणाम पावणें, संकोचित होणें व नाश पावणें हे सहा विकार घडून येतात; पण ते त्या वृक्षाला घडत नाहींत ॥ १८ ॥ त्याप्रमाणें हे दैत्यपुत्र हो, आत्मा तर नित्य, अक्षय, शून्य शुद्ध, अद्वितीय, शरीरादिकांचा ज्ञाता, सर्वांना आश्रयभूत, क्रियाशून्य, स्वयंप्रकाश, सर्वांचा उत्पादक, सर्वव्यापक, अलिप्त व आवरणरहित असा आहे ॥ १९ ॥ ह्यास्तव आत्मानात्म-विवेक उत्पन्न करण्यास समर्थ अशा ह्या आत्म्याच्या बारा लक्षणांनीं तो देहाहून भिन्न आहे असें जाणणाऱ्या पुरुषानें, देहादिकांविषयीं ' मी व माझें ' अशा प्रकारच्या असलेल्या मोहजन्य मिथ्याबुद्धीचा त्याग करावा ॥ २० ॥ हे असुरबालक हो, सुवर्णाच्या खाणीमध्यें चकचकणाऱ्या सुवर्णांनीं युक्त असलेल्या पाषाणांतून सुवर्ण काढण्याचे उपाय जाणणारा सोनार, भट्टी लावून जसें सुवर्ण काढून घेतो, त्याप्रमाणें देहरूप क्षेत्रांतून अध्यात्मज्ञानी पुरुष आत्मप्राप्तीच्या उपायांनीं ब्रह्मत्व प्राप्त करून घेतो ॥ २१ ॥ मूलप्रकृति महत्तत्त्व, अहंकार, शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्या आठ प्रकृति आहेत. सत्त्व, रज आणि तम हे तीन प्रकृतीचे गुण आहेत. श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका, वायु, उपस्थ, हस्त, पाद, वाणी आणि मन हीं अकरा इंद्रियें व पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें मिळून सोळा विकार आहेत. ह्या सर्वांच्या ठिकाणीं साक्षीरूपानें व्यापून असणारा एक आत्मा आहे, असें कपिलप्रभृति आचार्यांनीं सांगितलें आहे ॥२२॥ देह, प्रकृत्यादि सर्व समुदायात्मक असून स्थावर आणि जंगम असा दोन प्रकारचा आहे. ह्या देहामध्येंच अमुक द्रव्य आत्मा नव्हे, अशी परीक्षा करीत आत्मव्यतिरिक्त जें असेल त्याचा निरास करून, त्याहून निराळा असा जो अन्तर्यामी आत्मा, त्याचें शोधन करून घ्यावें ॥ २३ ॥ जसें मण्यांच्या माळेमध्यें सूत्र, सर्व मण्यांना व्यापून असतें, तसा आत्माहि सर्व व्यापून आहे आणि तें एकच सूत्र जसें प्रत्येक मण्याहून निराळें असतें तसा आत्माहि सर्व वस्तूंत असून निराळा आहे; असा हा अन्वयव्यतिरेक लक्षांत घेऊन शुद्ध झालेल्या मनाच्या योगानें जगाच्या उत्पत्तिस्थितिसंहारांच्या अनुसंधानानें एकाग्रपणें विचार करणाऱ्या पुरुषांनीं, त्या परमात्म्याचा शोध केला असतां त्यांना त्याचें ज्ञान होतें ॥ २४ ॥ आतां, हे दैत्यपुत्र हो,

जागरण, स्वप्न आणि सुषुप्ति अशा बुद्धीच्या तीन वृत्ति आहेत. त्यांचा अनुभव ज्यांच्या योगानें येतो, तो अवस्थात्रयाचा साक्षी परमपुरुष होय ॥ २५ ॥ ह्यास्तव, पुष्पधर्मरूप सुगंधाच्या योगानें, त्याला आश्रयभूत असलेला वायु जसा जाणतां येतो, त्याप्रमाणें आत्म्याचे धर्म नव्हेत म्हणून त्याग केलेले, कर्मापासून उत्पन्न झालेले व त्रिगुणात्मक असे जे हे जाग्रदादिक बुद्धीचे परिणामरूप भेद, यांच्या योगानें आत्म्याचें स्वरूप जाणावें. म्हणजे आत्मा वस्तुतः बुद्धीच्या जाग्रदादिक अवस्थांहून निराळा असून त्यांना व्यापून असल्यामुळें त्या अवस्थांनीं युक्त असल्यासारखा भासतो असें समजावें ॥२६॥ हे दैत्यपुत्र हो, संसार हा बुद्धीच्या गुणांनीं व कर्मांनीं बद्ध असल्यामुळें तो बुद्धीच्या द्वारानेंच पुरुषाला प्राप्त होतो. स्वतः प्राप्त होत नाहीं. तो अज्ञानमूलक असल्यामुळें तो असत्य असून स्वप्नाप्रमाणें मानिला आहे. ॥ २७ ॥ यास्तव त्रिगुणात्मक कर्मांच्या अज्ञानरूप बीजाला जाळून टाकणारा व बुद्धीच्या जाग्रदादि अवस्थारूप प्रवाहाचा नाश करणारा असा भक्तियोगच तुम्ही करा ! ॥ २८ ॥ हे मित्र हो, देहादिकांच्या ठिकाणीं आत्म्याचा होणारा आभास निवृत्त करण्याचे जे हजारों उपाय आहेत, त्यांमध्यें जेणेंकरून व ज्या साधनांनीं भगवान् ईश्वराच्या ठिकाणीं सत्वर प्रीति उत्पन्न होईल अशीं साधनें नारदानें सांगितलीं आहेत ॥ २९ ॥ तीं साधनें म्हणजे गुरूची शुश्रूषा करणें, प्राप्त झालेल्या सर्व वस्तु भगवंताला किंवा भगवद्भक्तांना समर्पण करणें, निष्कपट भक्तांचा सहवास, ईश्वराराधन, भगवत्कथेच्या ठिकाणीं श्रद्धा, भगवंताच्या गुणकर्मांचें कीर्तन, त्याच्या चरणकमलांचें ध्यान, त्याच्या मूर्तीचें दर्शन व पूजन आणि सर्व भूतांच्या ठिकाणीं दुःखहर्ता भगवान् ईश्वर वास करीत आहे असें मनामध्यें आणून त्याला मान देणें, हीं होत ॥ ३० ॥ ३१ ॥ ३२ ॥ ज्यांनीं कामक्रोधादि षड्रिपु जिंकिले आहेत, ते लोक ईश्वराची अशी भक्ति करितात व तिच्यायोगानें भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं पुरुषाला प्रीति उत्पन्न होते ॥ ३३ ॥ हे दैत्यपुत्र हो, इतरांच्या ठिकाणीं नसणारे असे श्रीभगवंताचे भक्तवात्सल्यादिक गुण, तशींच त्यानें स्वेच्छेनें धारण केलेल्या रामकृष्णादिक रूपांनीं केलेलीं लौकिकदृष्ट्या चेष्टारूप कर्में व रावणवधादिक पराक्रम, यांचें श्रवण करीत असतां अति हर्षानें शरिरावर रोमांच उठून, ज्याच्या नेत्रांमध्यें आनंदाश्रु येतात व रामस्वरूपीं तन्मय होऊन जो उच्चस्वरानें गायन करितो, रोदन करितो, नृत्य करितो, अथवा पिशाचानें झपाटल्यासारखा बेफाम होऊन कधीं हंसतो तर कधीं विलाप करितो, केव्हां भगवंताचें ध्यान करितो तर केव्हां लोकांना वंदन करितो आणि केव्हां भगवंताच्या ठिकाणीं, बुद्धि लीन झाल्यामुळें निर्लज्ज होऊन वारंवार श्वास टाकीत, ' हे हरे, हे जगत्पते, हे नारायणा' अशा हाका मारितो ॥ ३४ ॥ ३५ ॥ तेव्हां अतिवेगवान् अशा त्या उत्कृष्ट भक्तीच्या योगानें त्या पुरुषाचे ठायीं संसारास बीजभूत असलेलें असें अज्ञान आणि वासना हीं जळून जातात. त्याचें मन व तें शरीर हीं भगवंताच्या लीलारूप चिंतनानें तन्मय होऊन जातात व त्याचीं पुण्यपापादि सर्व बंधनें तुटून जाऊन तो भगवत्स्वरूपाला पावतो ॥ ३६ ॥ खऱ्या अंतःकरणानें केलेला भगवंताचा स्पर्श तोच इहलोकीं अशुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या पुरुषाच्या संसारचक्राचा नाश

करणारा होय व तेंच ब्रह्माच्या ठिकाणीं मोक्षरूप सुख होय, असें ज्ञानी पुरुष म्हणतात. म्हणून तुम्ही आपल्या हृदयांत असलेल्या अंतर्यामीं ईश्वराचें भजन करा ! ॥ ३७ ॥ हे असुरपुत्र हो, आपल्या स्वतःचा सखा व आकाशाप्रमाणें आपल्या हृदयामध्यें वास करणारा असा जो श्रीहरि, त्याची उपासना करण्यांत कोणता मोठा आयास आहे ? असें असतां विषयसुख संपादन करून काय मिळावयाचें आहे ? कारण, सर्वच प्राणी विषयोत्सुक असल्यामुळें आपणहि जर विषयसुखाविषयीं तत्पर झालों, तर त्यांच्यासारखेच आपण नव्हे काय ? ॥ ३८ ॥ द्रव्य, कलत्र, पशु व पुत्रादिसंबंधी जन, गृहें, भूमि, गजशाळा, भोगसाधनभूत पदार्थांच्या समृद्धि आणि सर्व प्रकारचे अर्थ व काम हे नश्वर असल्यामुळें, ज्याचें आयुष्यच क्षणभङ्गुर आहे अशा मर्त्य पुरुषाचें ते कितीसें प्रिय करणार आहेत ? ॥ ३९ ॥ ह्याचप्रमाणें यज्ञयागादिकांनीं प्राप्त झालेले जे हे स्वर्गादि लोक, तेहि विनाशी व पुण्यादि तारतम्यानें श्रेष्ठ व कनिष्ठ असून सर्वथा निर्मळ नाहींत, म्हणून सर्वोत्कृष्ट अशा ईश्वराचेंच तुम्ही आत्मप्राप्तीकरितां एकनिष्ठ भक्तीनें सेवन करा ! कारण तो सर्वथैव निर्दोष आहे. त्याच्यांत कोणीहि दोष पाहिलेला अथवा ऐकिलेला मुळींच नाहीं. ॥ ४० ॥ आपणासच विद्वान् असें मानणारा पुरुष जी वस्तु प्राप्त होण्याचा संकल्प करून ह्या लोकीं कर्मे करितो त्याला त्या संकल्पित कर्माचें फळ विपरीत असेंच बहुधा प्राप्त होतें ॥ ४१ ॥ संसारांत सुखाची प्राप्ति आणि दुःखाची निवृत्ति व्हावी यासाठीं कर्मे करण्याचा पुरुषाचा संकल्प असतो; परंतु, जो पूर्वी निरिच्छ असल्यामुळें सुखानें युक्त असतो, तोच इच्छा करूं लागला म्हणजे तिच्या योगानें सर्वदा दुःख पावतो ॥४२॥ या लोकीं काम्यकर्मांच्या योगानें ज्याच्याकरितां म्हणून पुरुष भोगांची इच्छा करितो, तो देह पाहूं गेलें असतां, श्वानसूकरादिकांच्या भक्ष्यस्थानीं पडणारा व नश्वर असून कर्मवशेंकरून तो प्राप्त होतो व नाशहि पावतो ॥ ४३ ॥ यास्तव ज्या अर्थी देहाचीच अशी स्थिति आहे, त्या अर्थी देहाहून निराळे असे माझे म्हणविले जाणारे जे पुत्र, कलत्र, गृह, द्रव्यादिक, राज्य, खजिना, हत्ती, अमात्य, भृत्य आणि आप्त हे सर्व नश्वर आहेत हें काय सांगावयास पाहिजे ? ॥ ४४ ॥ म्हणून नित्यानंदाचा केवळ समुद्रच अशा आत्म्याला, वस्तुतः अनर्थकारक असून बाह्यतः मात्र पुरुषार्थाप्रमाणें भासणाऱ्या व देहासहित नाश पावणाऱ्या अतितुच्छ अशा ह्या पुत्रादिकांनीं काय साधणार आहे ? ॥ ४५ ॥ हे असुर हो, गर्भादि अवस्थांमध्ये पूर्वकर्मांच्या योगानें क्लेश पावणाऱ्या ह्या देहधारी प्राण्याला या लोकीं कितीसा स्वार्थ साधतो तो सांगा बरें ॥ ४६ ॥ देहधारी प्राणी आत्म्याला अनुसरणाऱ्या देहाच्या योगानें कर्म करतो व कर्माच्या योगानें देह धारण करतो; पण त्या दोन्ही गोष्टी तो अज्ञानानेंच करतो ॥ ४७ ॥ म्हणून धर्म, अर्थ व काम हे ज्याच्या स्वाधीन आहेत, त्या निरपेक्ष, सर्वसमर्थ व दुःखहर्त्या परमात्म्याचें तुम्ही निष्कामबुद्धीनें सेवन करा ! ॥ ४८ ॥ कारण, तो श्रीहरिच स्वतः निर्माण केलेल्या पंचमहाभूतांपासून उत्पन्न केलेल्या सर्व प्राण्यांचा आत्मा, प्रिय, नियंता आणि अन्तर्यामी आहे ॥ ४९ ॥ दैत्यपुत्र हो, जसे आम्ही भगवंताचें भजन करून सुखी झालों,

तसा कोणीहि होईल. मग तो देव, असुर, मनुष्य, यक्ष अथवा गंधर्व कोणीहि असो ॥ ५० ॥ हे असुरपुत्र हो, मुकुंदाला संतुष्ट करण्याकरितां द्विजपणा, देवपणा, ऋषिपणा सद्वर्तन, बहुश्रुतपणा, दान, तप, याग, शुद्ध आचरण आणि व्रतें ही पुरीं होत नसून तो श्रीहरि केवळ निष्कामभक्तीच्याच योगानें संतुष्ट होतो. भक्तीवांचून इतर सर्व साधनें केवळ सोंगें होत ॥ ५१ ॥ ५२ ॥ यास्तव हे दानव हो, आपल्याप्रमाणें सर्वांना सुख व दुःख होतें अशी बुद्धि धारण करून सर्व भूतांचा आत्मा आणि ईश्वर असा जो भगवान् श्रीहरि त्याच्या ठिकाणीं भक्ति करा ! ॥ ५३ ॥ कारण, दैत्य, यक्ष, राक्षस, स्त्रिया, शूद्र, गोकुळवासी लोक, पक्षी, मृग आणि इतरहि पातकी जीव, अच्युताच्या भक्तीनें खरोखर मोक्ष पावले आहेत ॥ ५४ ॥ असो. गोविंदाच्या ठिकाणीं एकनिष्ठभक्ति आणि स्थावरजंगमात्मक सर्व भूतांच्या ठिकाणीं भगवान् आहे असें पहाणें, हाचा काय तो या लोकीं पुरुषाला उत्कृष्ट स्वार्थ सांगितलेला आहे ॥ ५५ ॥

## सातवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८ वा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, याप्रमाणें प्रल्हादाचें भाषण श्रवण केल्यावर तें निर्दोष आहे असें जाणून, गुरूच्या शिकवणीचा त्याग करून, सर्व दैत्यपुत्रांनीं त्याचा स्वीकार केला ॥ १ ॥ तेव्हां त्यांची बुद्धि अंतर्निष्ठ झाली असें पाहून शंडामर्कांना भय वाटलें आणि त्यानें तें सर्व वृत्त राजाला सत्वर जाऊन निवेदन केलें ॥ २ ॥ दुःसह आणि अप्रिय असें पुत्राचें दुर्वर्तन श्रवण करून, हिरण्यकशिपूचें शरीर कोपाच्या आवेशानें कांपूं लागलें, आणि पुत्राचा वध करावा असें त्यानें मनांत ठरविलें ॥ ३ ॥ मग विनयामुळें नम्र झालेला व इंद्रियांचें दमन केलेला असा तो प्रल्हाद हात जोडून आपल्या अग्रभागीं उभा आहे असें पाहून, जो तिरस्कार करण्यासहि अयोग्य, अशा त्या पुत्राची कठोर शब्दांनीं निंदा करून, स्वभावतःच क्रूर असा तो हिरण्यकशिपु पायानें ताडन केलेल्या सर्पाप्रमाणें फूत्कार टाकीत, सक्रोध व वक्रदृष्टीनें त्याच्याकडे पाहात प्रल्हादाला म्हणाला ॥ ४ ॥५ ॥ 'हे उद्धटा! हे मंदबुद्धे, हे कुलांत दुही उत्पन्न करणाऱ्या अधमा, अरे माझ्या आज्ञेचें उल्लंघन करणाऱ्या उद्धट अशा तुला आज मी यमसदनास पोंचवितों! ॥६ ॥ हे मूर्खा, जो क्रुद्ध झाला असतां लोकपालांसह तिन्ही लोक कंपित होतात, त्या माझ्या आज्ञेचें तूं निर्भय पुरुषाप्रमाणें कोणाच्या बळाचा आश्रय करून उल्लंघन करीत आहेस? ॥ ७ ॥

प्रल्हाद म्हणाला,—हे राजा, ब्रह्मदेवप्रभृति लहानथोर असे जे स्थावरजंगमात्मक सर्व प्राणी ज्यानें आपल्या स्वाधीन करून ठेविले आहेत, तो भगवान् केवळ माझेंच बळ आहे असें नाहीं; तर तुझें व इतरहि सर्व बलिष्ठ लोकांचें तोच बळ आहे ॥ ८ ॥ हे राजा, तो परमेश्वर भगवान् विष्णुच काळरूपी आहे. तोच इंद्रियशक्ति, मनःशक्ति, धैर्य, शरीरशक्ति आणि इंद्रियें ह्यांचा आधार आहे. तोच हा गुणत्रयाचा नियंता परमेश्वर आपल्या शक्तींच्या योगानें ह्या जगाचीं उत्पत्ति, स्थिति व संहार करितो ॥ ९ ॥ तूं आपल्या ह्या शत्रुमित्रादि कल्पनारूप आसुरी स्वभावाचा त्याग करून मनाची वृत्ति सर्वत्र सारखी ठेव. कारण, न जिंकलेल्या व कुमार्गामध्यें प्रवृत्त होणाऱ्या मनावांचून शत्रु असे दुसरे कोणीच नाहींत. मनाची वृत्ति सारखी राखणें हेंच भगवान् अनंताचें उत्कृष्ट पूजन आहे ॥ १० ॥ हे दैत्याधिपते, तुझ्यासारखे किती तरी मंदबुद्धि पुरुष प्रथम सर्वस्व हरण करणाऱ्या इंद्रियरूप षड्रिपूंना न जिंकितां, आपण दशदिशा जिंकिल्या आहेत असें मानितात; परंतु वास्तविक पाहूं गेलें असतां जो मनोनिग्रह करून ज्ञानी झाला आहे, आणि ज्याची सर्व प्राण्यांविषयीं समदृष्टि आहे त्या साधूंना मात्र देहाभिमानानें कल्पिलेले कामादिक मानसिक शत्रु नसतात. अर्थात् त्यांना बाहेरचे इतर शत्रु नसतात हें सांगावयास नकोच ॥ ११ ॥

हिरण्यकशिपु म्हणाला,– हे मंदबुद्धे, ज्या अर्थीं तूं अतिशय बडबड करीत आहेस, त्या अर्थीं खरोखर तुला मरणाचीच इच्छा झालेली दिसते; कारण, जे मरणोन्मुख झालेले असतात, तेच अशा प्रकारें अनन्वित बरळत असतात ॥ १२ ॥ हे मंदभाग्या, माझ्याहून दुसरा असा तूं जगाचा नियंता म्हणून सांगितलास, तो कोठें आहे ? तो सर्व ठिकाणीं जर आहे, तर मग ह्या खांबामध्यें कां दिसत नाहीं ? ॥ १३ ॥ तेव्हां व्यर्थ बडबड करणारें तुझें शिर मीं आतां धडापासून वेगळें करितों. तो तुझा आवडता हरि, जर तुझें रक्षण करणारा आहे, तर त्यास आतां येऊं दे !'॥१४॥ ह्याप्रमाणें रागाच्या आवेशांत कठोर शब्दांनीं आपल्या महाभगवद्भक्त पुत्राला वारंवार पीडा देणारा तो अतिबलाढ्य महादैत्य, हातामध्यें खड्ग घेऊन सिंहासनावरून उडी टाकिता झाला व आपल्या मुष्टीनें त्यानें स्तंभावर ताडण केलें ॥ १५ ॥ हे राजा, तोंच त्या खांबामध्यें अतिभयंकर असा ध्वनि उत्पन्न झाला व त्याच्यायोगानें ब्रह्मांडकटाह फुटलाच कीं काय, असें सर्वांस भासलें. तो ध्वनि, देव आपल्या स्थानीं बसले होते तेथेंहि जाऊन पोंचला. तो ध्वनि ऐकून आपल्या स्थानांचा नाश होतो कीं काय, असें ब्रह्मादिक देवांनाहि भय वाटलें ॥ १६ ॥ पुत्रवधाची इच्छा धरून, त्यासाठीं आपल्या बलानें प्रयत्न करणारा तो हिरण्यकशिपु, ज्याच्या योगानें दैत्यसेनाधिपति अत्यंत भयभीत झाले होते असा तो अपूर्व व अद्भुत नाद ऐकून, तो कशापासून निघाला तें जाणण्यासाठीं तो इकडेतिकडे पाहूं लागला; पण तो नाद कोठून निघाला, हें त्याच्या दृष्टीस पडलें नाहीं ॥ १७ ॥ इतक्यामध्यें सर्व भूतमात्रांमध्यें असलेली आपली व्याप्ति खरी करण्याकरितां व आपल्या भक्तांनीं केलेलें भाषण सत्य करण्याकरिता, मनुष्याकार नव्हे व मृगाकारहि नव्हे, असें अत्यंत अद्भुत रूप धारण करणारा भगवान् श्रीहरि सभेमधील त्या स्तंभांत प्रगट झाला ॥ १८ ॥ ह्याप्रमाणें अद्भुत नाद करणाऱ्या प्राण्याचा तो दैत्य चोहोंकडे दृष्टि फिरवून जो शोध करीत आहे, तोंच स्तंभांतून बाहेर निघणारें तें मनुष्याचें व सिंहाचें मिश्ररूप त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून 'हा मृगहि नव्हे व नरहि नव्हे, तर हा कोण विचित्र प्राणी आहे ?' असा तो विचार करूं लागला ॥ १९ ॥ तो मनाशीं विचार करीत आहे, इतक्यांत त्याच्यापुढें नृसिंहरूपी भगवान् दत्त म्हणून उभा राहिला. त्याचें रूप फारच भयानक होतें. त्याचे डोळे तापलेल्या सोन्याप्रमाणें लाल असून त्याच्या मानेवरील आयाळाचे केंस विजेप्रमाणें तळपत होते व त्यामुळें त्याचें मुख फारच विक्राळ व विशाल दिसत होतें ॥ २० ॥ त्याच्या दाढा भयंकर होत्या. जिव्हा तरवारीसारखी चंचल व वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण होती. चढविलेल्या भुंवयांमुळें त्याचें मुख उग्र दिसत होतें व कान शंकूप्रमाणें ताठ उभारलेले होते. त्याचें तोंड व नाकपुड्या हीं पर्वताच्या गुहेप्रमाणें विस्तृत असून जबडा पसरल्यामुळें तीं भयंकर दिसत होतीं. त्याचें मस्तक स्वर्गाला स्पर्श करीत होतें. त्याची मान आंखूड व स्थूळ होती. त्याचें वक्षःस्थळ विशाल असून उदर कृश होतें. चंद्रकिरणांप्रमाणें गौरवर्ण असे केंस त्याच्या सर्व अंगावर विखुरले होते. त्याचीं नखें हींच जणूं काय त्याचीं आयुधें होतीं. त्याच्या जवळ जाणें तर अशक्यच होतें.

स्वतःच्या चक्रादि व इतरांच्या वज्रादि आयुधांच्या योगानें ज्यानें सर्व दैत्यदानवांना पळवून लाविलें होतें अशा त्या स्वरूपाला पाहून हिरण्यकशिपु म्हणाला, मायावी श्रीहरीनें माझ्या मृत्यूच्या उपायार्थच हें रूप घेतलेलें दिसतें; पण असें हें रूप माझें काय करणार? असें म्हणून, त्यानें हातामध्यें गदा घेतली व गर्जना करीत तो दैत्यश्रेष्ठ नृसिंहाच्या सन्मुख वेगानें धावला; परंतु अग्नीमध्यें पडलेला पतंग जसा दिसेनासा होतो, त्याप्रमाणें नृसिंहाच्या तेजापुढें तो दैत्य निस्तेज झाला ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ २४ ॥ अहो, ज्या हरीनें सृष्टीच्या आरंभीं आपल्या तेजाच्या योगानें प्रलयकालाच्या अंधःकाराचा सुद्धां नाश केला होता, त्या सत्त्वप्रकाशरूपी श्रीहरीच्या ठिकाणीं त्या तमोगुणी असुराचें अदर्शन झालें हें कांहीं आश्चर्य नव्हे. त्या महादैत्यानें भगवंताच्या सन्मुख येऊन, क्रोधपूर्वक अतिवेगानें फिरविलेल्या आपल्या गदेनें नृसिंहाला प्रहार केला ॥ २५ ॥ तेव्हां जसा गरुड मोठ्या सर्पाला पकडतो, त्याप्रमाणें आपल्यावर प्रहार करणाऱ्या त्या हिरण्यकशिपूला नृसिंहानें त्याच्या गदेसह हातीं धरिलें; परंतु क्रीडा करणाऱ्या गरुडाच्या हातून जसा सर्प गळून पडतो त्याप्रमाणें त्या नृसिंहाच्या हातांतून तो असुरहि सुटून गेला ॥ २६ ॥ हे भरतकुलोत्पन्ना धर्मराजा, त्या हिरण्यकशिपूनें ज्यांचीं स्थानें हरण केल्यामुळें जे भीतीनें मेघांच्या आड दडून राहिले होते, अशा त्या सर्व लोकपालांना व देवांना, नृसिंहाच्या हातांतून दैत्य सुटला असें पाहतांच, अत्यंत वाईट वाटलें. कारण, युद्धामध्यें नेहमीं बेफिकीर असणारा तो महादैत्य नृसिंहाच्या हातांतून सुटल्याबरोबर, आपल्या बलानें नृसिंह भयभीत झाला आहे असें मानिता झाला आणि हातांत ढाल व तलवार घेऊन मोठ्या वेगानें पुनरपि तो त्या नृसिंहावर चालून गेला ॥ २७ ॥ हे राजा, पण शेवटीं, ससाण्याप्रमाणें ज्याचा वेग आहे व जो ढालतलवारींचे कुशलतेनें हात करीत असल्यामुळें ज्याच्यावर प्रहार करण्यास मुळीं अवकाशच सांपडत नाहीं, अशा त्या हिरण्यकशिपूला, महावेगवान् नृसिंहानें, तीव्र व भयंकर असें हास्य करून, सर्प जसा उंदराला पकडतो, त्याप्रमाणें पकडिलें. त्या वेळीं श्रीहरीच्या हास्यध्वनीनें व तेजानें त्या हिरण्यकशिपूचे डोळे मिटूनच गेले ॥ २८ ॥ ज्या हिरण्यकशिपूच्या त्वचेला पूर्वी इन्द्राचें वज्रहि दुखवूं शकलें नव्हतें, असा तो महादैत्य, भयभीत होऊन नरसिंहाच्या हातून सुटण्याची धडपड करूं लागला; पण गरुड जसा अतितीव्र विषधारी सर्पाचेंहि विदारण करितो, त्याप्रमाणें नृसिंहानें द्वारामध्येंच संध्याकाळचे समयीं त्या दैत्याला आपल्या मांडीवर उताणें पाडून नखांनीं त्याचें हृदय विदारण केलें ॥ २९ ॥ नंतर ज्याचे नेत्र क्रोधानें लाल झाल्यामुळें ज्याकडे अवलोकन करणेंहि कठीण झालें आहे, जो आपल्या जिभेनें आपले विशाल ओठ चाटीत आहे, ज्याच्या मानेवरील केंस व मुख हीं रक्तबिंदूंनीं लिप्त झाल्यामुळें लाल झालीं आहेत, ज्यानें त्या दैत्याच्या आंतड्याच्या माळा आपल्या कंठामध्यें धारण केल्या आहेत, जो हत्तीच्या वधानें शोभणाऱ्या सिंहाप्रमाणें भासत आहे आणि जो अनेक बाहूंनीं युक्त आहे, अशा त्या नृसिंहरूपी श्रीहरीनें नखाग्रांनीं त्या हिरण्यकशिपूचें हृदयकमळ विदारण केल्यानंतर त्याला मांडीवरून खालीं टाकून दिलें. नंतर ज्यांनीं आयुधें

उचललीं आहेत अशा त्याच्या सेवकांना व त्याच्या मागून येणाऱ्या त्याच्या पक्षपाती हजारों दैत्यांना, नखरूप शस्त्रांनीं व पायांच्या टाचांनींच मारून टाकिलें ॥ ३० ॥ ३१ ॥ हे राजा, त्या वेळीं त्या नृसिंहाच्या मानेवरील केंसांमुळें कंपित झालेले मेघ विखरून गेले. आदित्यादि ग्रह त्याच्या दृष्टीनें निस्तेज झाले, त्याच्या श्वासानें ताडित झालेले सागर क्षोभ पावले व त्याच्या गर्जनेनें भ्यालेले दिग्गज उच्चस्वरानें आक्रोश करूं लागले ॥ ३२ ॥ त्याच्या मानेवरील केंसांच्या फटकाऱ्यानें उडालेल्या विमानांतील देव स्थानभ्रष्ट झाले. त्याच्या पायांच्या भारानें पीडित झालेली पृथ्वी दबून गेली, त्याच्या वेगानें पर्वत ढासळून पडले आणि त्याच्या तेजानें आकाश व दिशा निस्तेज झाल्या ॥ ३३ ॥ नंतर ज्याचें उग्र तेज सर्वत्र फांकलें आहे, ज्याला कोणीच प्रतिस्पर्धी उरला नाहीं, ज्याचें स्वरूप अति-भयंकर आहे, असा तो प्रभु नृसिंह, त्या सभेमध्यें राजसिंहासनावर बसला असतां त्याचा स्तव करण्याकरितां त्याच्याजवळ जाण्याचें धैर्य कोणालाही होईना ॥ ३४ ॥ असो, मस्तकांतील शूळव्यथेप्रमाणें त्रैलोक्यास दुःसह अशा त्या आदिदैत्य हिरण्यकशिपूचा युद्धामध्यें श्रीहरीनें वध केला असें पाहून, अतिहर्षामुळें ज्यांचीं मुखें विकसित झालीं आहेत अशा देवांगना त्या नृसिंहावर पुष्पांचा वर्षाव करूं लागल्या ॥ ३५ ॥ त्या नृसिंहाला पाहण्याकरितां देवांच्या विमानांनीं आकाशमंडळ भरून गेलें, नगारे नौबतीच्या ध्वनीनें दशदिशा दुमदुमून गेल्या, अप्सरा नृत्य करूं लागल्या आणि गंधर्वश्रेष्ठ गायन करूं लागले ॥ ३६ ॥ हे धर्मराजा, नंतर ब्रह्मदेव, इंद्र, शिव इत्यादि देव, ऋषि, पितर, सिद्ध, विद्याधर, श्रेष्ठ नाग, मनु, प्रजापति, गंधर्व, अप्सरा, चारण, यक्ष, किंपुरुष, वेताळ, सिद्ध, किंनर आणि सुनंद व कुमद इत्यादि विष्णूचे सर्व पार्षद तेथें आले व नृसिंहाच्या संनिध हात जोडून उभे राहिले आणि सिंहासनावर बसलेल्या त्या प्रखर तेजधारी नृसिंहाची विविध प्रकारांनीं स्तुति करूं लागले ॥ ३७ ॥ ३८ ॥ ३९ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—हे परमेश्वरा, ज्याच्या शक्ति अनंत आहेत, ज्याचे पराक्रम विचित्र आहेत, ज्याचीं कर्में श्रवणमात्रेंकरूनच अंतःकरणाला शुद्ध करणारीं आहेत, जो आपल्या सहज लीलेनें सत्त्वादिक गुणांच्या योगें जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार करितो, असें असूनहि ज्याच्या स्वरूपाचा कधींहि नाश होत नाहीं, त्या अनंतस्वरूपी तुज भगवंताला प्रसन्न करून घेण्याकरितां मी नम्र झालों आहें ॥ ४० ॥ रुद्र म्हणाला,—हे भक्तवत्सला, सहस्र युगांचा अंत हाच तुझा वास्तविक कोपकाळ होय; पण आतां तर हा क्षुद्र असुर तूं मारिला आहेस. यास्तव विनाकारण क्रोध न धरितां, तुला शरण आलेला हा दैत्याचा पुत्र जो भक्त प्रल्हाद त्याचें तूं रक्षण कर ॥ ४१ ॥

इंद्र म्हणाला,—हे परमेश्वरा, यज्ञामध्यें अंतर्यामीरूपानें तूंच भोक्ता असल्यामुळें दैत्यापासून आमचें रक्षण करून हे प्रभो, तूं स्वतःचे हविर्भाग परत घेतले आहेस. तुझें गृहरूप जें आमचें हृदयकमळ तें ह्या दैत्याच्या भयानें व्यापून गेलें होतें परंतु तें भय दूर करून तूं तें विकसित केलें आहेस. हे स्वामिन्, तुझी शुश्रूषा करणाऱ्या भक्तजनांना, काळानें गिळून टाकलेलें असें हें त्रैलोक्याचें ऐश्वर्य काय करावयाचें आहे ? त्यांना

मुक्तिसुद्धां जर महत्त्वाची वाटत नाहीं, तर स्वर्गादिक इतर ऐश्वर्याची काय किंमत? ॥४२॥

ऋषि म्हणाले,—हे आदिपुरुषा, आपल्या स्वरूपांत पूर्वी लीन असलेलें हें विश्व तूं ज्या तपाच्या योगानें उत्पन्न केलें आहेस, तें आपलें प्रभावरूप सर्वोत्कृष्ट तप, तूं आम्हां ऋषींना उपदेशिलें होतेंस, तें तप ह्या दैत्यानें लोपवून टाकिलें असतां, हे शरणागत पालका, भक्तांच्या रक्षणार्थ तूं हें नृसिंहस्वरूप धारण करून, पुनरपि ' तप करा ! ' अशी आम्हांस आज्ञा दिली आहेस; त्या तुज भगवंताला आमचा नमस्कार असो ॥ ४३ ॥

पितर म्हणाले,—हे देवा, आम्हांला पुत्रांनीं श्रद्धापूर्वक दिलेलीं पिंडदानें जो आपणच बलात्कारानें भक्षण करीत असे आणि तीर्थस्नान करतेवेळीं दिलेलें तिलोदकहि जो पीत असे, त्या दैत्याच्या उदराची त्वचा तूं नखांनीं विदारण करून त्यांतून ते पिंडादिक बाहेर काढिले आहेस; त्या तुज सर्वधर्मरक्षक नृसिंहाला आमचा नमस्कार असो ॥४४ ॥

सिद्ध म्हणाले,—हे नृसिंहा, योग व तप यांच्या बलानें ज्या दुष्टानें आमची अणिमादि सिद्धिरूप योगसिद्ध गति हरण केली होती, त्या अनेकप्रकारच्या दर्पानें युक्त असलेल्या दैत्याचें तूं आपल्या नखांनीं विदारण करून आमचें संकट दूर केलेंस, त्या तुला आम्हीं नमस्कार करितों ! ॥ ४५ ॥

विद्याधर म्हणाले,—नाना प्रकारच्या धारणेनें प्राप्त झालेल्या आमच्या गुप्त होणाऱ्या विद्येला, देहशक्ति व पराभवसामर्थ्य ह्यांच्या योगानें गर्विष्ठ झालेल्या ज्या मूर्खानें प्रतिबंध केला होता, त्या दैत्याचा ज्यानें युद्धामध्यें पशूप्रमाणें वध केला आहे, त्या हे नृसिंहरूपधारी प्रभो, तुला आम्हीं नम्र आहों ! ॥ ४६ ॥

नाग म्हणाले,— हे परमेश्वरा, ज्या पाप्यानें आमच्या फणांतील रत्नें व आमच्या स्त्रिया हरण केल्या होत्या, त्याच्या वक्षःस्थलाचें विदारण करून त्या स्त्रियांना तूं आनंद दिला आहेस अशा तुला नमस्कार असो ॥ ४७ ॥

मनु म्हणाले,- हे देवा, आम्ही तुझ्या आज्ञेप्रमाणें वागणारे मनु आहों. आजपर्यंत दैत्य हिरकण्यकशिपूनें आमच्या वर्णाश्रमासंबंधीं सर्व धर्ममर्यादा मोडून टाकिल्या होत्या. त्या दुष्टाचा तूं वध करून आम्हांस संकटमुक्त केलेंस. यास्तव हे प्रभो, आतां आम्हीं तुझी कोणती सेवा करावी, त्याविषयीं आम्हां दासांना आज्ञा करा ॥ ४८ ॥

प्रजापति म्हणाले—हे परमेश्वरा, तूं उत्पन्न केलेले आम्हीं प्रजापति आहों. ज्या दैत्यानें प्रतिबंध केल्यामुळें प्रजा उत्पन्न करण्याचें आमचें कार्य बंद पडलें होतें त्याच्या वक्षःस्थळाचें तूं विदारण केल्यामुळें तो नष्ट झाला आहे; आतां आम्ही पुन्हा प्रजा उत्पन्न करूं शकूं. हे सत्त्वमूर्ते, हा तुझा अवतार जगाचें कल्याण करणारा आहे. ॥ ४९ ॥

गंधर्व म्हणाले,—हे प्रभो, तुझ्या अग्रभागीं नृत्य करणाऱ्या व नृत्यामध्यें गायन करणाऱ्या आम्हांला, शौर्य आणि शक्ति ह्यांच्या बलावर ज्या दैत्यानें आम्हांस आजपर्यंत आपल्या आधीन करून ठेवलें होतें, तो हा दैत्य आज तुझ्या हातून मरण पावला आहे; कारण, कुमार्गानें प्रवृत्त झालेल्या पुरुषाचें कल्याण कधींहि होत नाहीं ॥ ५० ॥

चारण म्हणाले,—हे हरे, साधूंच्या अंतःकरणामध्यें भय उत्पन्न करीत असलेल्या ह्या असुराला तूं मारून टाकिल्यामुळें, तुझ्या संसारनिवर्तक चरणकमळांचा आश्रय करून राहिलेले आम्ही निर्भय झालों आहोंत ॥ ५१ ॥

यक्ष म्हणाले,–हे नरहरे, मनोहर कर्माच्या योगानें तुझ्या सेवकांमध्यें श्रेष्ठ झालेले जे आम्हीं, त्या आम्हांला ह्या दितिपुत्र हिरण्यकशिपूनें पालखीला वाहरणारे भोई केलें होतें; परंतु हे प्रभो, तूं लोकांचें दुःख जाणणारा आहेस. तूं हा अवतार घेऊन आज त्या दैत्यास पंचत्वास पोंचविलें आहेस ॥ ५२ ॥

किंपुरुष म्हणाले, —हे देवा, आम्हीं अतितुच्छ प्राणी आहों व तूं तर अद्‌भुतप्रभाववान्, सर्वनियंता पुरुषोत्तम आहेस. जेव्हां भगवद्‌भक्तांनीं ह्या दैत्याचा तिरस्कार केला, तेव्हांच वस्तुतः हा दुर्जन नष्ट झाला होता ॥ ५३ ॥

वैतालिक म्हणाले,—हे भगवन्, सभा व यज्ञ ह्यांमध्यें तुझ्या निर्मळ यशाचें गायन करून आम्ही पूर्वीं मोठमोठे मान मिळविले; परंतु या वैऱ्यानें ते सर्व अगदीं बंद करून टाकिले होते. तेव्हां रोगासारखा असा हा घातकी दुर्जन दैत्य तूं मारून टाकिलास ही फार चांगली गोष्ट झाली ॥ ५४ ॥

किन्नर म्हणाले, –हे ईश्वरा, आम्हीं किन्नरगण तुझे अनुयायी असून ह्या दितिपुत्र हिरण्यकशिपूनें आम्हांला वेठीला लाविलें होतें. हे हरे, तो पापी दैत्य तूं मारून टाकिला आहेस. हे नाथ, हे नरसिंहा, तूं आम्हां सेवकांचा आतां उत्कर्ष कर ! ॥ ५५ ॥

विष्णुपार्षद म्हणाले, —आम्हां भक्तजनांना आश्रय देणाऱ्या हे भगवंता, सर्व लोकांना मंगलकारक असें हें तुझें अद्‌भुत नृसिंहरूप आम्हीं आज पाहिलें. हे ईश्वरा, हा हिरण्यकशिपु मूळचा तुझा दासच असून ब्राह्मणांचा शाप झाल्यामुळें दैत्य झाला होता; तेव्हां त्याचा वध त्याच्या अनुग्रहासाठींच तुझ्याकडून झाला आहे असें आम्ही समजतों ॥ ५६ ॥

**आठवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ९ वा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, ह्याप्रमाणें दूर उभे राहून स्तुति करीत असलेले ब्रह्मरुद्रप्रभृति सर्व देवादिक, ज्याला क्रोधानें आवेश चढला आहे व म्हणून ज्याच्याजवळ जाणें अत्यंत कठीण झालें आहे, अशा त्या नृसिंहाजवळ जाण्यास समर्थ झाले नाहींत॥ १ ॥ फार काय, परंतु प्रत्यक्ष लक्ष्मीला देवांनीं कोपशान्त्यर्थ त्याच्याकडे पाठविलें असतां, तीहि, पूर्वीं कधींहि न पाहिलेलें असें तें भगवंताचें अत्यंत अद्भुत नृसिंहरूप अवलोकन करून भयभीत झाली व त्यामुळें त्याजवळ जाऊं शकली नाहीं ॥ २ ॥ तेव्हां ब्रह्मदेवानें भगवंताजवळ उभ्या असलेल्या प्रल्हादाला प्रभूचा क्रोध शांत करण्याकरितां पाठविलें. ब्रह्मदेव म्हणाला, बा प्रल्हादा, तूं प्रभूजवळ जा, आणि आपल्या पित्यावर क्रुद्ध झालेल्या प्रभूला शांत कर ॥ ३ ॥ हे राजा, तेव्हां 'ठीक आहे' असें म्हणून तो महाभगवद्भक्त बालक प्रल्हाद हळूहळू भगवंताजवळ गेला व हात जोडून त्यानें त्याला साष्टांग नमस्कार केला ॥ ४ ॥ त्या वेळीं आपल्या पायां पडत असलेल्या त्या बालकाला पाहून तो प्रभु कृपेनें सद्गदित झाला व त्याला उठवून, कालरूप सर्पापासून ज्याची बुद्धि गलित झाली आहे अशा शरणागतांना अभयदान देणारा आपला हस्त त्यानें त्याच्या मस्तकावर ठेविला ॥ ५ ॥ नृसिंहाचा करस्पर्श होतांच प्रल्हादाचें वासनारूप सर्व पाप नष्ट झालें व तत्क्षणींच त्याला भगवंताच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञानहि झालें. परमानंदामुळें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले, त्याचें हृदय प्रेमानें आर्द्र झालें, त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचे लोट वाहूं लागले आणि त्यानें आपल्या हृदयामध्यें भगवंताचे चरणकमळ धारण केलें ॥ ६ ॥ नंतर शांतचित्त असा तो प्रल्हाद भगवंताच्या ठिकाणीं आपलें हृदय व दृष्टि लावून एकाग्र अंतःकरणपूर्वक प्रेमानें सद्गदित झालेल्या शब्दांनीं श्रीहरीचें स्तवन करूं लागला ॥ ७ ॥

प्रल्हाद म्हणाला,— सत्त्वगुणाच्या ठिकाणीं एकाग्रबुद्धि असलेले ब्रह्मादिक देवगण, नित्य भगवच्चिंतन करणारे ऋषि आणि ज्ञानसंपन्न असे सनकादिक सिद्ध बहुत काळपर्यंत आराधन करीत असून हा वेळपर्यंतहि आपल्या प्रवाहांनीं व धनरूपादि गुणांनीं ज्याला संतुष्ट करूं शकले नाहींत, तो श्रीहरि असुरयोनींत जन्मलेल्या मजवर कसा संतुष्ट होईल? ॥ ८ ॥ वित्त, सत्कुलामध्यें जन्म, सौंदर्य, तप, पांडित्य, इंद्रियसौष्ठव, कांति, प्रताप, शरिरशक्ति, उद्योग, बुद्धि आणि अष्टांगयोग हे बाराहि गुण, लोकांमध्यें व शास्त्रांमध्यें जरी श्रेष्ठ म्हणून प्रसिद्ध आहेत तथापि ते परमपुरुष भगवंताला संतुष्ट करण्यास समर्थ होत नाहींत, असें मी मानितों. कारण, केवळ भक्तीच्याच योगानें भगवान् गजेंद्रावर संतुष्ट झाला होता ॥ ९ ॥ या बारा गुणांनीं युक्त परंतु पद्मनाभ भगवंताच्या चरणकमलापासून विमुख अशा ब्राह्मणांपेक्षां, ज्यानें मन, कर्म, द्रव्य आणि प्राण हे त्या पद्मनाभाच्या

ठिकाणीं अर्पण केले आहेत त्या चांडाळाला सुद्धां मी श्रेष्ठ मानितों. कारण, तो चांडाळ हरिभक्तीमुळें आपलें सर्व कुळ पवित्र करितो; पण अतिगर्विष्ठ ब्राह्मणाला तसें करितां येत नाहीं ॥ १० ॥ हा ईश्वर आत्मलाभानेंच पूर्णकाम झाल्यामुळें आपल्याकरितां क्षुद्रजनांपासून पूजेची इच्छा करीत नाहीं; परंतु तो कृपाळू असल्यामुळें भक्ताकरितांच तिची इच्छा करितो. कारण आपल्या मुखावर असलेली शोभा जशी आरशांतील प्रतिबिंबाला प्राप्त होते,त्याप्रमाणें ज्या धनादिकांच्या योगानें भक्त भगवंताचें पूजन करितो तें सर्वहि त्या भक्ताला स्वतःलाच प्राप्त होतें ॥ ११ ॥ सारांश, भगवान् ज्या अर्थी केवळ भक्तीच्याच योगें संतुष्ट होतो, त्या अर्थी मी जरी नीच आहें, तथापि आतां निःशंकपणें यथामति ईश्वराचें महात्म्य वर्णन करीत आहें. तेव्हां, त्या माहात्म्याच्या गुणवर्णनानें संसारांत पडलेला पुरुषहि जर शुद्ध होतो तर मी कां होणार नाहीं ? ॥ १२ ॥ हे ईश्वरा, तुला भीत असलेले हे सर्वहि ब्रह्मादि देव, आम्हां असुरांप्रमाणें वैरभावानें तुझी भक्ति करणारे नसून सत्त्वमूर्ति अशा तुझ्या भगवंताच्या आज्ञेमध्यें श्रद्धापूर्वक वागणारे भक्त आहेत. तूं आपल्या मनोहर अवतारांच्या योगानें करीत असलेल्या नाना प्रकारच्या लीला, ह्या विश्वाच्या कल्याणाकरितां, ऐश्वर्यप्राप्तीकरितां आणि आत्मानंदाच्या लाभाकरितांच असतात, त्यांना भय उत्पन्न करण्याकरितां नसतात ॥ १३ ॥ यास्तव हे भगवन्, आतां क्रोध आवरा. हा असुर तर आतां मरण पावला आहे. दुसऱ्यास उपद्रव करणाऱ्या विंचू, साप इत्यादिक प्राण्यांच्या वधानें, साधूलाहि आनंदच होईल. सर्व लोक आतां सुखी झाले असून, तुझ्या क्रोधाचा उपशम होण्याची आतां वाट पाहात आहेत. हे नृसिंहा, भयनिवृत्तीकरितां सर्व लोक ह्या नृसिंहस्वरूपाचें स्मरण करितील ॥ १४ ॥ हे अजिता, विक्राळ मुख व जिव्हा, सूर्यासारखे नेत्र, चढविलेल्या भुंवया व तीक्ष्ण दाढा यांमुळें अति भयंकर दिसणारें तुझें मुख, आंतड्यांच्या माळा घातलेला कंठ, रक्तानें भरलेले मानेवरील केंस, शंकूसारखे उभे टवकारलेले कान, दिग्गजांनाहि भयभीत करणारा शब्द आणि शत्रूंना विदारण करणारीं नखें, असें हें तुझें भयंकर रूप आहे; पण या रूपाला मी मुळींच भीत नाहीं ॥ १५ ॥ परंतु हे दीनवत्सला, दुःसह आणि उग्र असें जें संसारचक्रांतील दुःख त्याला मात्र मी भिऊन गेलों आहे. ह्याठिकाणीं पातकी लोकांमध्यें मी कर्मांनीं बद्ध होऊन पडलों आहें. तेव्हां हे प्रिय परमात्म्या, मजवर तूं प्रसन्न होऊन संसारदुःखनिवर्तक अशा आपल्या आश्रयभूत चरणकमळाजवळ मला केव्हां बोलावून नेशील ? ॥ १६ ॥ नाना प्रकारच्या योनींमध्यें दुःख पावत असलेल्या या जीवाला तुझी सेवा करण्याचें ज्ञान कांहींच नाहीं. यास्तव तूंच त्या ज्ञानाचा मला उपदेश कर. हे विभो, प्रिय वस्तूंपासून वियोग आणि अप्रिय वस्तूंशीं संयोग, ह्यांच्यामुळें उत्पन्न होणाऱ्या शोकाग्नीनें सर्व योनींमध्यें मी पोळून गेलों आहें.दुःखाच्या निवृत्तीचा उपाय म्हणून जो करावा तोहि दुःखमयच होतो. देहादिकांच्या अभिमानानें मी मोहित झालों आहे. यास्तव हे प्रभो, तुझी सेवा करण्याचा उपाय तूं मला कथन कर ॥ १७ ॥ हे नृसिंहा, तूं अनुग्रह केल्यामुळें, तुझ्या दासाच्या

ठिकाणीं प्रवृत्त झालेला, तुझ्या चरणद्वयाचा आश्रय करणारा, सत्पुरुषांचा समागम करणारा, विषयांपासून मुक्त होऊन तुझा प्रिय, मित्र व श्रेष्ठ अशा देवतारूप ब्रह्मदेवानें गायन केलेल्या तुझ्या लीलांच्या कथा मी वर्णन करूं लागलों म्हणजे सर्व संसारदुःखें अनायासानें तरून जाईन ॥ १८ ॥ हे नृसिंहा, दुःखांनीं संतप्त झालेल्या जनास दुःखनिवृत्तीचा उपाय म्हणून जो या लोकीं सांगितलेला आहे, हे विभो, तूं उपेक्षा केलेल्या लोकांना तो क्षणमात्रच होतो, कायमचा होत नाहीं. उदाहरण. मातापितर हे बालकाचे रक्षक या लोकीं जरी आहेत, तथापि ते कायमचे नव्हेत. कारण, ते रक्षण करीत असतांहि बालकांना दुःख होत असलेलें दृष्टोत्पत्तीस येतें. तसेंच औषध रोग्याचें रक्षक म्हणावें तर तेंहि नाहीं. कारण, औषध दिलें असतांहि मृत्यु येतो असें आपल्या अनुभवास येतें. त्याप्रमाणें नौका ही समुद्रामध्यें बुडत असलेल्या प्राण्यांचें रक्षण करणारी आहे असें म्हणावें तर तीहि नाहीं. कारण, कधींकधीं नौकेसह लोक समुद्रामध्यें बुडतात, असें आपल्या दृष्टीस पडतें. यास्तव खरा रक्षक असा एक तूंच आहेस ॥ १९ ॥ हे भगवन्, सत्त्वादि स्वभावयुक्त असा प्राचीन ब्रह्मादिक मुख्य कर्ता अथवा त्यानें प्रेरणा केलेला असा अर्वाचीन पित्रादिक कर्ता, जेथें ज्या निमित्तास्तव, ज्या काळीं, ज्या साधनानें, ज्याच्यापासून, ज्याकरितां, ज्याकारणानें जें उत्पन्न करितो अथवा ज्याचें रूपांतर करितो, असें हें सर्व जग तुझेंच स्वरूप आहे ॥ २० ॥ हे सर्वशक्तिमान् जन्मादिविकारशून्य परमेश्वरा, ज्याच्या अवलोकनरूप अनुग्रहानें प्रेरित झालेल्या काळाच्या योगानें, जिच्यांतील सत्त्वादि गुणांचा क्षोभ झाला आहे अशी माया, अविद्येच्या द्वारानें जिवाच्या भोगाकरितां सोळा विकारांनीं आणि अनंत कर्मवासनांनीं युक्त अशा प्रकारें वेदोक्तकर्मप्रधान असें हें लिंगशरीर उत्पन्न करते. अशा कर्मबंधनानें बद्ध झालेला पुरुष, मनःप्रधान अशी तुझी भक्ति केल्यावांचून या संसारचक्रांतून कसा बरें मुक्त होईल ? ॥ २१ ॥ हे समर्था ईश्वरा, तूं आपल्या चैतन्यशक्तीच्या योगानें निरंतर बुद्धीचे गुण जिंकले आहेस. तूं मायेचा नियंता असून सर्व कार्यांच्या व साधनांच्या शक्ति तूंच आपल्या स्वाधीन ठेवितोस. मायेनें सोळा विकारात्मक संसारचक्रामध्यें सांपडलेला असा मीं, पिळून निघणाऱ्या उसाप्रमाणें अत्यंत पीडित झालों आहें. तरी मज शरणागताला आपल्या समीप ओढून घे ॥ २२ ॥ हे प्रभो, संसारी मनुष्य स्वर्गलोकांत जें प्राप्त व्हावें म्हणून इच्छा करितो, तें सर्व लोकपालांचें आयुष्य, संपत्ति व आधिपत्यरूप अधिकार अतितुच्छ आहेत, असें मी पाहिलें आहे. कारण जे लोकपाल माझ्या पित्याच्या नुसत्या कोपयुक्त हास्यानें व फिरविलेल्या भुंवयांच्या चालनानें विध्वंस पावत होते, असा जो माझा पिता तो तूं मारून टाकिलास ॥ २३ ॥ सारांश, जीवांचे हे भोग, आयुष्य, संपत्ति आणि वैभव, ह्यांचे परिणाम जाणत असल्यामुळें, ब्रह्मदेवाच्या भोगापर्यंत इंद्रियांनीं उपभोग घेण्यास योग्य असलेल्या कोणत्याहि विषयाची इच्छा मी करीत नाहीं. कारण, त्या सर्वहि अणिमादि संपत्ति तुज कालरूप परमेश्वराच्या महापराक्रमानें उद्ध्वस्त झाल्या आहेत. यास्तव मला तूं आपल्या सेवकांजवळ नेऊन पोंचीव ॥ २४ ॥ कानाला मात्र गोड लागणाऱ्या, परंतु

मृगजळाप्रमाणें मिथ्या असलेल्या सर्व विषयादि वासना आणि सर्व रोगांचें उद्भवस्थान असें शरीर, हीं सर्व नश्वर आहेत असें जाणत असतांहि, त्यापासून विरक्त न होतां, त्या दुःसाध्य मानून विषयलालसेनें सर्व प्राणिमात्र मधाप्रमाणें त्या कामरूप अग्नीचीच शांति करूं पाहातात ! ॥ २५ ॥ हे ईश्वरा, ज्यामध्यें तमोगुण अधिक आहे व जें रजोगुणानेंच उत्पन्न झालें आहे, अशा असुरकुळामध्यें उत्पन्न झालेला मी कोणीकडे ? आणि तुझी कृपा कोणीकडे ? पण ती कृपा तूं मजवर केली आहेस आणि ब्रह्मदेव, रुद्र व लक्ष्मी यांच्याहि मस्तकावर कधीं ठेविला नाहीं असा तुझा तो कमळाप्रमाणें सर्व संताप दूर करणारा विजयी कर तूं माझ्या मस्तकावर ठेविला आहेस. ॥ २६ ॥ हे ब्रह्मादि देव श्रेष्ठ आहेत, व हा असुर नीच आहे, ही उत्कृष्टनिकृष्ट भावनारूप बुद्धि एखाद्या प्राकृत मनुष्यासारखी तुझ्या ठिकाणीं नाहीं. कारण, तूं जगाचा आत्मा व हितकर्ता आहेस. हे परमेश्वरा, सेवेच्या योगानेंच तुझा प्रसाद होतो; परंतु जसा कल्पवृक्ष सेवकाच्याच इच्छेनुसार फळ देतो, पण तो स्वतः विषम मुळींच नसतो, त्याप्रमाणें सेवातारतम्यानें तुझ्या प्रसादापासून धर्मादिकांची प्राप्ति होते; म्हणून उत्कृष्टत्व निकृष्टत्व हें कांहीं तुझ्या प्रसादाला कारण नाहीं ॥ २७ ॥ संसाररूपी सर्पयुक्त कूपामध्यें पडलेल्या विषयेच्छु लोकांच्या मागून त्यांच्या सहवासानें त्या संसारकूपांत पडलो असतां, देवा, तुझा आतां जसा हा प्रसाद झाला, तसाच पूर्वी देवर्षि नारदानें मला आपला असें म्हणून माझ्यावर अनुग्रह केला. तुझ्या सेवकांच्या सेवेच्या अनुग्रहाचा मीं कसा बरें त्याग करीन ? ॥ २८ ॥ हे अनंता, पुत्रवधासारखें अयोग्य कर्म करण्याच्या इच्छेनें, जेव्हां माझा पिता हातांत खड्ग घेऊन मला मारावयास उभा राहिला, आणि–' तुला मान्य असा ईश्वर माझ्याहून जर निराळा आहे तर तो आतां तुझें रक्षण करो ! '–असें म्हणाला, त्या समयीं तूं प्रगट होऊन, पित्याचा वध करून माझें रक्षण केलेंस. हें तुझें कृत्य, तुझा भक्त जो नारद त्याचें वाक्य खरें करण्याकरितांच होतें ॥ २९ ॥ हे भगवन्, हें सर्व जग, तूंच एक आहेस. कारण, ह्याच्या आरंभीं, शेवटीं आणि मध्येंहि तूच प्रत्ययास येतोस. हे जगदात्म्या, आपल्या मायेनें हें गुणपरिणामात्मक जग उत्पन्न करून त्याच्यामध्यें प्रविष्ट झालेला तूं त्या गुणांच्या योगानें, उत्पन्न करणारा, रक्षण करणारा व मारणारा अशा अनेक रूपांनीं युक्त असल्यासारखा भासतोस ॥ ३० ॥ हे ईश्वरा, हें कार्यकारणात्मक जग तूंच आहेस, तुझ्याहून निराळें असें कांहीं नाहीं. तूंच ह्या जगाच्या आदि, अंतीं व मध्यें असून त्यापासून निराळा आहेस; म्हणून ' हा आपला व हा दुसऱ्याचा ' अशी जी ही बुद्धि ती केवळ व्यर्थ माया आहे. कार्यरूप वृक्ष ज्याप्रमाणें कारणरूपानें बीजात्मक असतो, तसेंच बीजहि पृथ्वीरूप असून, ती पृथ्वी पुनः आपल्या सूक्ष्मरूपानें बीजांत असते, त्याप्रमाणेंच माती आदिकरून ज्या पदार्थापासून घटादि पदार्थांची उत्पत्ति होते व प्रकाश, लय व स्थिति हीं त्यांस प्राप्त होतात, पण घटादिक पदार्थ मृत्तिकारूपच असतात. तद्वत् हें सर्व कार्यकारणात्मक जग परमकारण असें तुझेंच स्वरूप आहे ॥ ३१ ॥ हे भगवन्, तूं प्रलयकाळाच्या उदकामध्यें आपल्याच योगानें आपल्याच ठिकाणीं या जगाचा उपसंहार करून आत्मसुखाचा अनुभव घेत

कर्मरहित होऊन शयन करितोस; पण स्वरूपानुसंधानरूप योगानें डोळे मिटून व स्वरूपप्रकाशानें निद्रा जिंकून, जाग्रदादिक अवस्थांच्याहून निराळ्या अशा आपल्या तुरीय स्वरूपांत तूं राहतोस. परंतु तमआदिकरून गुणांनीं तूं केव्हांही बद्ध होत नाहींस ॥ ३२ ॥ तूं स्वतःच्या कालशक्तीनें प्रकृतीचे सत्त्वादि धर्म प्रेरित केले असून उदकामध्यें शेषशय्येवर शयन करितोस. हें जग तुझेंच स्वरूप आहे व याच्यामध्यें तूच आहेस; कारण शेषशय्येपासून तुझ्या योगनिद्रारूप समाधीचें जेव्हां विसर्जन होऊं लागलें, तेव्हां वटबीजापासून उत्पन्न होणाऱ्या महावटवृक्षाप्रमाणें तुझ्याठिकाणीं लीन असलेलें हें ब्रह्मस्वरूप महाकमळ तुझ्या नाभीपासून प्रलयोदकामध्यें उत्पन्न झालें ॥ ३३ ॥ हे ईश्वरा, त्या कमळापासून उत्पन्न झालेल्या सूक्ष्मदृष्ट्या ब्रह्मदेवालाहि त्या कमळाबांचून इतर कांहींच दिसेनासें झालें; तेव्हां स्वतःच्या ठिकाणीं बीजभूत असलेल्या अशा तुला तो बाहेर शोधूं लागला व उदकामध्यें प्रवेश करून त्यानें पुष्कळ काळपर्यंत तुझा शोध केला; पण त्याला तुझी प्राप्ति झाली नाहीं. याचें कारण उघड आहे. अहो, अंकुर उत्पन्न झाला असतां त्याला व्यापून असलेलें कारणरूप बीज त्याहून निराळें असें कसें बरें मिळेल ? ॥ ३४ ॥ हे ईश्वरा, त्या ब्रह्मदेवानें शंभर वर्षेपर्यंत उदकामध्यें शोध करीत असतांहि जेव्हां तुला पाहिलें नाहीं तेव्हां अतिविस्मित होऊन तुझा शोध करण्याचें त्यानें सोडून दिलें आणि नाभिकमलाचा आश्रय करून दीर्घ काळ तप केलें. नंतर तपानें अंतःकरण शुद्ध झाल्यावर, जसा भूमीमध्यें सूक्ष्मरूपानें गंध व्याप्त असतो. त्याप्रमाणें भूतें, इंद्रियें आणि मन ह्यांनीं बनलेल्या आपल्या देहांत अतिसूक्ष्मरूपानें व्याप्त असलेला जो तूं, त्या तुला त्यानें अवलोकन केलें ॥ ३५ ॥ त्या वेळीं अपरिमित मुखें, पाय, मस्तकें, हात, मांड्या, नाक, कर्ण, नेत्र, भूषणें आणि आयुधें ह्यांनीं समृद्ध व चतुर्दशलोकविस्तारात्मक रचनेनें युक्त आणि मायामय अशा विराट् पुरुषरूपानें स्थित असलेल्या तुला पाहून त्या ब्रह्मदेवाला आनंद झाला ॥ ३६ ॥ त्या वेळीं हयग्रीवमूर्ति धारण करून तूं त्या वेदद्रोही व अतिप्रबल अशा रजस्तमोरूप मधुकैटभनामक दैत्याचा वध केलास व ब्रह्मदेवाला वेदसमूह आणून दिलास. म्हणून सत्त्वगुण हीच तुझी अत्यंत प्रिय मूर्ति आहे असें मानितात ॥ ३७ ॥ हे महापुरुषा, ह्याप्रमाणें तूं मनुष्यांमध्यें रामादिक, तिर्यग्योनींमध्यें वराहादिक, ऋषींमध्ये परशुरामादिक, देवांमध्ये वामनादिक व जलचरांमध्यें मत्स्यकूर्मादिक अवतार धारण करून लोकांचें पालन करितोस व जगाला प्रतिकूळ असतील त्यांचा वध करितोस आणि निरनिराळ्या युगांमध्यें चालू असलेल्या धर्माचें रक्षण करितोस. परंतु कलियुगामध्यें तूं अवतार धारण करून तें पालनादिक कार्य करीत नाहींस, म्हणून तीनच युगांमध्यें प्रगट होणारा तूं ' त्रियुग ' ह्या नांवानें प्रसिद्ध आहेस ॥ ३८ ॥ हे वैकुंठनाथा, पातकांनीं दूषित, बहिर्मुख, दुर्धर, कामातुर व हर्ष, शोक, भय ह्यांनीं दुःखित झालेलें हें माझें मन, तुझ्या कथांत रममाण होत नाहीं; अशा स्थितींत हे प्रभो, मी दीनानें तुझ्या स्वरूपाचा विचार कसा करावा ? ॥ ३९ ॥ हे अच्युता, ज्याप्रमाणें अनेक भार्यांच्या पतीला त्याच्या स्त्रिया सवतीमत्सरानें जशा आपल्याकडे ओढितात त्याप्रमाणें कधींहि तृप्त न होणारी अशी ही

जिव्हा मला मधुरादि रसांकडे आकर्षण करिते, शिस्न कामिनीकडे ओढून नेतें, त्वचा चंदनादि पदार्थांकडे ओढिते, क्षुधेनें तृप्त झालेलें उदर आहाराकडे नेतें, श्रवणेंद्रिय गायनाकडे घेऊन जातें घ्राणेंद्रिय सुगंधाकडे नेतें, आणि चंचल दृष्टि रूपाकडे वळविते. अशा प्रकारें हीं कर्मेंद्रियें आपापल्या विषयाकडे मला ओढून नेतात ॥ ४० ॥ हे नित्यमुक्त ईश्वरा, आपल्या कर्मानें संसाररूप वैतरणीनदीमध्यें पडलेल्या, परस्परांच्या संसर्गानें मरण, जन्म व विषयसेवन ह्यांपासून अत्यंत भयभीत झालेल्या आणि स्वजनांच्या देहाविषयीं मैत्री व व इतरांच्या देहांविषयीं वैर धारण करणाऱ्या अशा ह्या मूढ जनसमुदायाला पाहून अरेरे! ह्यांना फार दुःख होत आहे! असें म्हणून तूं त्यावर दया कर, आणि ह्या वैतरणीनदींतून त्यांना बाहेर काढून त्याचें रक्षण कर ॥४१॥ हे जगद्गुरो, ह्या विश्वाची उत्पत्ति व लय ह्यांचें कारण तूंच आहेस. ह्या जनांचा उद्धार करण्याला तुला प्रयास तो काय पडणार आहे? मूढ जनांवर तुज महात्म्याचा अनुग्रह होणें अवश्य आहे. दुःखितांना साह्य करणाऱ्या हे दीनबंधो, तुझी सेवा करणाऱ्या एकट्या भक्तजनाचाच उद्धार करून काय उपयोग? ॥४२॥ हे सर्वोत्तमा, मला स्वतःला दुस्तर अशा ह्या संसाररूप वैतरणीनदीची भीति मुळींच वाटत नाहीं; कारण, तुझ्या चरित्राच्या गानरूप महामृतामध्यें माझें अंतःकरण अगदीं तल्लीन होऊन गेलें आहे; परंतु त्या महामृतापासून ज्याचें चित्त पराङ्मुख झालें आहे व इंद्रियनिमित्त मायिक विषयसुखाकरितां ज्यांनीं कुटुंबपोषणाचा भार अंगावर घेतला आहे अशा मूढ जनांचेंच मला फार वाईट वाटतें ॥ ४३ ॥ हे देवा, प्रायशः स्वतःलाच मुक्ति प्राप्त होण्याविषयींची इच्छा करणारे मुनि, एकांतस्थळीं मौन धारण करून ध्यानादिक कर्मे करीत असतात; पण ह्या दीन जनांना सोडून आपण एकटें मुक्त व्हावें अशी इच्छा मी करीत नाहीं, हे परमेश्वरा, अनेक योनींमध्यें भ्रमण पावत असणाऱ्या ह्या मूढ जनांचा उद्धार करणारा तुजवांचून दुसरा कोणीहि मला दिसत नाहीं ॥ ४४ ॥ हे परमात्म्या, मैथुनादिकांच्या योगें गृहस्थाश्रमी पुरुषांना होणारें जें सुख, तें अतितुच्छ असून, जसें हातांनीं खाजविलेल्या खाजेपासून प्रथम किंचित सुख वाटतें, परंतु मागाहून अधिकच दुःख होतें; तसें हें गृहस्थाश्रमासंबंधीं सुखहि उत्तरोत्तर अधिकच दुःखकारक आहे; परंतु शरिरांतील कामवेदना अनिवार असल्यामुळें कामुक जन खरजेप्रमाणें नानाप्रकारचीं दुःखें भोगीत असूनहि गृहसंबंधीं सुख आतां पुरे असें न मानतां कंडूप्रमाणें कामवासनेंतच रममाण होतो ॥४५॥ हे अंतर्यामी परमात्म्या, मौन, व्रतें, श्रवण, तप, वेदाध्ययन, स्वधर्म, ग्रंथव्याख्यान, एकांतवास, जप आणि समाधि हे जे दहा धर्म आहेत, ते बहुतकरून अजितेंद्रिय लोकांना केवळ जीवनाचे उपायच होतात; पण दांभिकांना तर ते निवार्हाचीं साधनें होतील कीं नाहीं हा संशय आहे ॥४६॥ हे प्रभो. वस्तुतः तूं रूपरहित आहेस. बीजांकुरांप्रमाणें कार्यकारणात्मक अशीं जीं दोन रूपें वेदानें प्रकाशित केलीं आहेत त्यांखेरीज तुझें ज्ञापक चिन्ह दुसरें कांहींच नाहीं. जसें अग्निहोत्री काष्ठांत असलेल्या अग्नीला मंथनानें प्राप्त करून घेतात, त्याप्रमाणें इंद्रियनिग्रह करणारे योगी कार्यकारणामध्यें व्यापकरूपानें असणाऱ्या तुला भक्तियोगानें प्रत्यक्ष अवलोकन करितात; दुसऱ्या उपायांनीं तुझें

स्वरूपज्ञान होत नाहीं ॥ ४७ ॥ हे सर्वव्यापी परमेश्वरा, वायु, अग्नि, पृथ्वी, आकाश, जल, शब्दादि विषय, प्राण, इंद्रियें, मन चित्त, अहंकार व स्थूलसूक्ष्मात्मक असें हें सर्व जग तूंच आहेस, किंबहुना मन आणि वाणी यांनीं प्रकाशित केलेली कोणतीहि वस्तु तुझ्याहून भिन्न नाहीं ॥ ४८ ॥ हे उरुगाय भगवन् सत्वादि गुण गुणाभिमानी देव, देव व मनुष्यें यांसह महदादि तत्त्वें, तसेंच मन, बुद्धि इत्यादिकांचें अभिमानी देव हे सर्व आदि व अंत ह्यांनी युक्त असल्यामुळें तुला जाणत नाहींत. ह्यास्तव विद्वान् लोक अध्ययनादि व्यापारापासून अलग राहतात; ॥४९॥ पण हे अतिपूज्य परमात्म्या; प्रणिपात, स्तुति, सर्वकर्म समर्पण, उपासना, तुझ्या चरणाचें स्मरण व तुझ्या कथेचें श्रवण अशा सहा प्रकारच्या सेवेवांचून, पुरुषाला परमहंसांना प्राप्त होण्यास योग्य अशी भक्ति कशी प्राप्त होईल ?॥५०॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, याप्रमाणें भक्त प्रल्हादानें भक्तिपूर्वक निर्गुण परमात्म्याच्या गुणांचें वर्णन केलें असतां तो परमात्मा प्रसन्न झाला, आणि कोप आंवरून त्या नम्र झालेल्या प्रल्हादाशीं बोलूं लागला ॥५१॥

श्रीभगवान् म्हणाले, —हे असुरश्रेष्ठा प्रल्हादा, तुझें कल्याण असो. मी तुजवर प्रसन्न झालों आहें. यास्तव हे कल्याणा, तूं इष्ट वर माग. कारण, मी पुरुषांच्या मनकामना पूर्ण करणारा आहें. ॥ ५२ ॥ हे आयुष्मन् प्रल्हादा, मला प्रसन्न न करणाऱ्या पुरुषास माझें दर्शन होणें खरोखर दुर्लभ आहे; परंतु ज्याला माझें दर्शन होतें तो प्राणी शोकभयापासून मुक्त होतो. ॥ ५३ ॥ ह्याकरितां सदाचारसंपन्न, महाभाग्यवान् आणि आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा करणारे विवेकी पुरुष, सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या मज परमेश्वराला परम भक्तीनें संतुष्ट करितात ॥ ५४ ॥ हे धर्मराजा, याप्रमाणें प्राण्यांना लोभ उत्पन्न करणाऱ्या वरांच्या योगानें, भगवंतानें लोभ दाखविला असतांहि भगवंताविषयींच्या एकांत भक्तीमुळें, त्या असुरश्रेष्ठ प्रल्हादानें, त्या वरांची इच्छा मुळींच केली नाहीं ॥ ५५ ॥

## अध्याय नववा समाप्त

# अध्याय १० वा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, वर मागण्यासंबंधाचें भगवंताचें तें भाषण भक्तियोगाला विघ्नकारक आहे असें मानणारा तो प्रल्हाद बालक आश्चर्य प्रदर्शित करीत भगवंताला उत्तर देऊं लागला ॥ १ ॥

प्रल्हाद म्हणाला,—हे परमेश्वरा, स्वभावतःच विषयांच्या ठिकाणीं आसक्त असलेल्या मला, असल्या वराच्या आमिषानें लोभवूं नकोस. कारण विषयांच्या संगाची भीति वाटल्यामुळेंच त्यांपासून विरक्त होऊन मोक्षप्राप्ति होण्याच्या इच्छेनें तुला मी शरण आलों आहें ॥ २ ॥ हे प्रभो, हृदयाच्या गांठीप्रमाणें बंधास कारण होणारे व संसाराला बीजभूत असे जे विषय, त्यांविषयीं जी तूं प्रेरणा केलीस, ती केवळ माझी कसोटी पाहण्याकरितां केली आहेस ॥ ३ ॥ नाहींपेक्षां, हे जगद्गुरो, कृपाळू अशा तुला अनर्थ साधनामध्यें आपल्या भक्ताला प्रवृत्त करणें शक्यच नाहीं. हे ईश्वरा, तुझ्यापासून जो भक्त विषयप्राप्तीची इच्छा करतो तो भक्तच नव्हे, तर केवळ व्यापारी होय ॥ ४ ॥ जो सेवक स्वामीपासून आपले मनोरथ पूर्ण करण्याची इच्छा करितो तो सेवकच नव्हे व जो स्वामी सेवकापासून स्वकार्य साधण्याच्या इच्छेनें त्याला द्रव्य देतो, तो स्वामीहि नव्हे; तर ते परस्पर व्यापारी समजले पाहिजेत ॥ ५ ॥ तुझ्यामध्यें असलेला स्वामिसेवकभाव मात्र वास्तविक आहे; परंतु मी तर तुझा निष्काम भक्त आहें व तूंहि माझा निरपेक्ष स्वामी आहेस. ह्यामुळें जसा राजा आणि सेवक ह्यांच्यामध्यें कारणपरत्वें स्वामिभृत्यभाव असतो तसा आपल्यामध्यें नाहीं ॥ ६ ॥ तथापि हे वरदश्रेष्ठ परमेश्वरा, तूं जर मला इष्ट वर देत असलास, तर माझ्या हृदयामध्यें वासनांचा अंकुरच उत्पन्न होऊं नये, असा मी तुजपासून वर मागतों. ॥ ७ ॥ हे कमलनयना, कामांकुराच्या उत्पत्तीमुळें, इंद्रियें, मन प्राण, देह, धर्म, धैर्य, सारासार विवेक, लज्जा, ऐश्वर्य, प्रताप, स्मृति आणि सत्य हीं सर्व नाहींशीं होतात. ॥ ८ ॥ हे पुंडरीकाक्षा, जेव्हां पुरुष, मनामध्यें असलेल्या सर्व कामवासनांचा त्याग करितो तेव्हांच तुझ्यासारखें ऐश्वर्य मिळविण्यास तो योग्य होतो ॥ ९ ॥ हे भगवंता, हे महात्म्या पुराणपुरुषा, हे श्रीहरे, हे अद्भुत नृसिंहरूप धारण करणाऱ्या ब्रह्मस्वरूप परमात्म्या, तुला नमस्कार असो ॥ १० ॥

श्रीनृसिंह म्हणाला,—हे प्रल्हादा, तुझ्यासारखे जे माझे एकनिष्ठ भक्त आहेत ते कधींहि इहलोकसंबंधीं अथवा परलोकसंबंधीं विषय मजपासून प्राप्त होण्याची इच्छा करीत नाहींत. तथापि हें मन्वंतर संपेपर्यंत तूं दैत्यांचा राजा होऊन ह्या भूलोकीं विषयांचा उपभोग घे ॥ ११ ॥ तसेंच माझ्या आवडत्या कथा श्रवण करीत, सर्व भूतांमध्यें राहणाऱ्या एकट्या मज यज्ञाधिपत्या परमेश्वराला मनामध्यें धारण करून तूं माझें आराधन कर आणि सर्व कर्में मला

अर्पण करून त्यांच्या बंधापासून मुक्त हो ॥ १२ ॥ सुखानुभवानें पुण्याचा सदाचरणानें पातकाचा आणि कालवेगानें देहाचा त्याग करून, देवलोकींहि गायन करण्यास योग्य अशी अत्यंत पवित्र कीर्ति इहलोकीं संपादन करून तूं कर्मबंधनापासून मुक्त होशील व शेवट मजप्रत प्राप्त होशील ॥१३॥ तुझें व माझें स्मरण करीत जो पुरुष, तूं गाइलेल्या माझ्या स्तोत्राचें पठण करील तोहि कर्मबंधनापासून मुक्त होईल ॥ १४ ॥

प्रल्हाद म्हणाला—हे महेश्वरा, वर देणाऱ्या ब्रह्मादिकांचा तूं अधिपति आहेस. तरी तुजपासून दुसरें असें एक मागणें मागतों कीं, क्रोधानें अंतःकरण व्याप्त झाल्यामुळें ईश्वरी तेज न जाणणाऱ्या माझ्या पित्यानें, 'हा माझ्या भ्रात्याचा घात करणारा आहे' अशा असत्य दृष्टीनें, साक्षात् तुज त्रैलोक्याधिपति सर्वलोकगुरूची निंदा केली व मी जो तुझा भक्त त्याशीं द्रोह केला; त्या मोठ्या व दुर्धर पातकापासून तो माझा पिता मुक्त होवो! हे दीनवत्सला, तूं कटाक्षदृष्टीनें त्याच्याकडे पाहिलेंस तेव्हांच वस्तुतः तो पवित्र झाला आहे ॥ १५ ॥ ॥ १६ ॥ ॥ १७ ॥

श्रीभगवान् म्हणाले, – हे निष्पापा, तुझा पिता आपल्या एकवीस पूर्वजांसह पवित्र झाला आहे. कारण, हे साधो, ह्याच्या घरीं कुल पवित्र करणारा असा तूं उत्पन्न झालास! ॥ १८ ॥ हे प्रल्हादा, जेथें जेथें अत्यंत शांत, समदर्शी, परोपकारी आणि सदाचारसंपन्न असे माझे भक्त असतात, ते कीकट देशासारखे अत्यंत अपवित्र असलेले देशहि पवित्र होतात ॥ १९ ॥ हे दैत्यश्रेष्ठा, माझ्या भक्तीनें निरिच्छ झालेले जे लोक आहेत, ते कामक्रोधादिकांमुळें जरी कदाचित् परतंत्र झाले, तथापि ते लहानथोर प्राण्यांपैकीं कोणाचीहि हिंसा करीत नाहींत ॥ २० ॥ या लोकीं जे पुरुष तुला अनुसरून वागावतील, ते सुद्धां माझे भक्त होतील; तूं तर खरोखर माझ्या भक्तांमध्यें श्रेष्ठ आहेस ॥ २१ ॥ हे प्रल्हादा, माझ्या शरिराचा स्पर्श झाल्यामुळें सर्व प्रकारें पवित्र झालेल्या आपल्या पित्याचीं केवळ शास्त्रमर्यादारक्षणार्थ तूं और्ध्वदेहादिक कार्यें कर म्हणजे तुज सत्पुत्राच्या योगानें तो उत्तम लोकास जाईल ॥ २२ ॥ आणि बा प्रल्हादा, ब्रह्मवेत्त्याच्या वचनाला अनुसरून तूं पित्याच्या स्थानावर आरूढ हो आणि माझ्या ठिकाणीं मन लावून व मजवर निष्ठा ठेवून सर्व कर्में आचरण कर! ॥ २३ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, ह्याप्रमाणें भगवंतानें आज्ञा केल्याप्रमाणें प्रल्हादानें पित्याचें योग्य तें और्ध्वदेहिक कृत्य केलें आणि नंतर द्विजश्रेष्ठांनीं त्याला राज्याभिषेक केल्यावर तो प्रल्हाद भगवत्पर होऊन सर्व कर्में करूं लागला ॥ २४ ॥ नंतर प्रसन्नतेमुळें सौम्यवदन झालेल्या त्या नृसिंहरूप श्रीहरीला पाहून देवादिकांसहित ब्रह्मदेव पवित्र शब्दांनीं त्याची स्तुति करूं लागला ॥ २५ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,– हे देवाधिदेवा, हे सर्वांतर्यामी परमात्म्या, तूं प्रजापतींचाहि पूर्वज आहेस. लोकांना त्रास देणारा हा पापी असुर तूं मारिलास, ही फार चांगली गोष्ट झाली ॥ २६ ॥ हा दैत्य, माझ्यापासून वर प्राप्त झाल्यामुळें मीं उत्पन्न केलेल्या देवमनुष्यादिकांपासून मृत्यु पावण्यास अशक्य झाला होता व तप आणि योग यांच्या बलानें गर्विष्ठ

होऊन त्यानें वेदप्रणीत सर्व धर्म नाहींसे करून टाकिले होते; यास्तव त्याला तूं मारलेंस ही फार चांगली गोष्ट झाली ॥ २७ ॥ त्याप्रमाणें बालक असूनहि सदाचरणसंपन्न व महाभगवद्भक्त असा त्याचा पुत्र जो प्रल्हाद त्याला तूं मृत्यूपासून सोडविलेंस व तो तुला शरण आला हेंहि फार चांगलें झालें ॥ २८ ॥ हे भगवन्, तुझें हें स्वरूप, मनोनिग्रहपूर्वक तुझें ध्यान करणाऱ्या पुरुषाला सर्व भीतीपासूनहि किंबहुना वध करण्याची इच्छा करणाऱ्या मृत्यूपासूनहि रक्षण करणारें आहे ॥ २९ ॥

नृसिंह म्हणाला, –हे ब्रह्मदेवा, आजपासून अशा प्रकारचा वर क्रूरस्वभावाच्या असुरांना तूं कधींहि देऊं नकोस. कारण, सर्पांना दूध पाजिलें असतां तें जसें सज्जनांना उपद्रव करितें; तसाच स्वभावतः निर्दय अविचारी अशा असुरांना दिलेला वरहि लोकांना उपद्रव करणारा होतो ॥ ३० ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाला सांगून त्याचें पूजन केल्यावर, भगवान् श्रीनृसिंह तेथेंच अंतर्धान पावला; (अदृश्य झाला). ॥३१॥ नंतर भगवंताचे अंशभूत असे जे ब्रह्मदेव, महादेव, कश्यपादि प्रजापति व इंद्रादि देव ह्यांचें त्या भक्त प्रल्हादानें उत्तमप्रकारें पूजन करून त्यांना वंदन केलें ॥३२॥ नंतर भृगुप्रभृति मुनिसिंह ब्रह्मदेवानें प्रल्हादाला, दैत्य व दानव ह्यांचें आधिपत्य दिलें ॥३३॥ हे राजा, याप्रमाणें प्रल्हादानें ब्रह्मादिदेवांची पूजा केल्यानंतर सर्व देव त्याला उत्तमप्रकारचे आशीर्वाद देऊन आपआपल्या स्थानीं निघून गेले ॥ ३४ ॥ असो. हे धर्मराजा, ह्याप्रमाणें पूर्वी जयविजयसंज्ञक असलेले मूळचे विष्णुपार्षद ब्राह्मणांच्या शापामुळें दितीचे पुत्र झाले असतां, त्यांच्या हृदयामध्यें वैरभावानें असलेल्या श्रीहरीनें त्यांचा वध केला ॥ ३५ ॥ नंतर त्याच शापामुळें ते रावण व कुंभकर्ण ह्या नांवांनीं दोन राक्षस झाले. त्या वेळीं प्रभूनें रामावतार घेऊन त्यांचा वध केला ॥ ३६ ॥ रामाच्या बाणांनीं त्यांचें हृदय विदीर्ण होऊन ते युद्धभूमीवर पडले असतां पूर्वजन्माप्रमाणेंच त्यांनीं आपलें चित्त रामाकडे लावून देहाचा त्याग केला ॥ ३७ ॥ नंतर तेच फिरून या भूलोकीं शिशुपाल व दंतवक्त्र ह्या नांवांनीं पुनः उत्पन्न झाले आणि वैरानुबंधानें हे धर्मराजा, तूं पाहात असतांच श्रीहरीच्या ठिकाणीं सायुज्य मुक्ति पावले ॥ ३८ ॥ हे राजा, कुंभारीणनामक माशीनें वारंवार दंश केलेला कीटक, जसा तिच्या निरंतर ध्यानामुळें तिचें स्वरूप पावतो, त्याप्रमाणें कृष्णद्रोही राजांनीं कृष्णनिंदादिकांच्या योगानें पूर्वी जें पातक केलें होतें, तें श्रीकृष्णाच्या नित्य ध्यासानें नष्ट होऊन शेवटीं ते त्याच्या स्वरूपाला पोंचले ॥ ३९ ॥ असो. जे एकनिष्ठ भक्त आहेत, ते भेददृष्टिरहित अशा सर्वोत्कृष्ट भगवद्भक्तानें श्रीहरीचें चिंतन करून जसे पूर्वी त्याच्या सारूप्याला पोंचले, त्याप्रमाणें शिशुपालप्रभृति राजेहि वैरानुबंधानें श्रीहरीचें चिंतन करून त्याच्या सारूप्याला पोंचले आहेत ॥ ४० ॥ हे राजा, दमघोषाचे पुत्र आदि करून श्रीकृष्णाचा द्वेष करीत असूनहि त्याच्या सायुज्याला कसे पावले, असें जें तूं मला विचारलें होतेंस तें सर्व तुला मी कथन केलें आहे ॥ ४१ ॥ ह्याप्रमाणें हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु ह्या आदि दैत्यांचा वध जिच्यामध्यें वर्णिला आहे, अशी ही ब्रह्मज्ञानसंपन्न व भक्तिमान् परमपूज्य अशी

श्रीनृसिंहवताराची पुण्यकारक कथा मीं तुला कथन केली आहे ॥ ४२ ॥

याप्रमाणें ह्या आख्यानामध्यें महाभगवद्भक्त प्रल्हादाचें चरित्र म्हणजे त्याची भक्ति, त्याला झालेलें भगवद्विषयक तत्त्वज्ञान व वैराग्य हीं सर्व कथन केलीं आहेत. तसेंच उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्यांचा अधिपति जो श्रीहरि त्याचें खरें स्वरूप, त्याच्या गुण-कर्माचें प्रल्हादानें केलेलें वर्णन, तसाच देवदैत्यादिकांच्या स्थानांचा कालेंकरून झालेला फेरफार, व ज्यांच्या योगानें भगवंताची प्राप्ति होते असा भगवद्भक्तांचा धर्म आणि आत्मा-नात्मविवेक करण्याचें साधन हे सर्वहि प्रकार या आख्यानामध्यें पूर्णरीतीनें वर्णिले-आहेत ॥ ४३ ॥ ४४ ॥ ४५ ॥ असें हें विष्णूच्या पराक्रमाच्या वर्णनानें विस्तार पावलेलें पुण्यकारक आख्यान, जो पुरुष श्रद्धेनें श्रवण करील, तो पुण्यपापरूप कर्मपाशापासून मुक्त होईल ॥ ४६ ॥ ह्या आदिपुरुष विष्णूच्या नृसिंहरूपानें केलेल्या हिरण्यकशिपुवधरूप लीलांचें व भगवद्भक्तांमध्यें श्रेष्ठ अशा दैत्यपुत्र प्रल्हादाच्या पुण्यकारक प्रभावांचें जो पुरुष शुचिर्भूत होऊन श्रवण करून पठण करील तो निर्भय अशा वैकुंठ लोकाला पावेल ॥४७॥

नारद म्हणतात,—हे धर्मराजा, ह्या मनुष्यलोकामध्यें तुम्ही पांडव खरोखर महाभाग्यशाली आहां; कारण ज्या तुमच्या घरीं मनुष्यरूप धारण करून गुप्तरूपानें साक्षात् श्रीकृष्णनामक परब्रह्म वास करीत असल्यामुळें, त्या तुमच्या दर्शनमात्रेंकरून सर्व लोकांस पवित्र करणारे महासमर्थ ऋषि चोहोंकडून येत असतात ॥ ४८ ॥ हे धर्मराजा, महाविवेकी लोकांना इच्छा करण्यास योग्य असा जो उपाधिरहित परमानंद, त्याचा अनुभवरूप जें परब्रह्म तोच हा खरोखर तुमचा प्रिय सुहृद्, मातुलपुत्र, आत्मा, आज्ञाधारक, गुरु आणि तुम्हांला पूज्य असा श्रीकृष्ण होय ॥ ४९ ॥ हे राजा, शंकर ब्रह्मदेव इत्यादिकांनाहि आपल्या बुद्धीच्या योगानें ज्याचें वास्तविक तत्त्व, ( ईश्वराचें प्रत्यक्ष रूप ) साक्षात् वर्णन करितां येत नाहीं, तो हा भक्तपालक भगवान्, मौन, भक्ति आणि इंद्रियदमन यांच्या योगानें आम्हीं पूजिला आहे; तो आम्हांवर प्रसन्न होवो ! हे राजा, पूर्वीं अत्यंत मायावी अशा मयासुरानें एकदां नाहींसे केलेलें श्रीरुद्रदेवाचें यश तें ह्या भगवंतानेंच विस्तृत केलें होतें ॥ ५० ॥ ५१ ॥

युधिष्ठिर म्हणाला,—हे देवर्षे, कोणत्या कर्मामध्यें जगदीश्वर महादेवाची कीर्ति मयासुरानें नष्ट केली होती. व ती ह्या श्रीकृष्णानें पुनरपि कशी वृद्धिंगत केली, हें मला सांगावें ॥ ५२ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, श्रीकृष्णानें उत्कर्षास चढविलेल्या देवांनीं, एकदां असुरांना युद्धामध्यें पराजित केलें असतां ते मायाव्याचा श्रेष्ठ आचार्य जो मयासुर त्याला शरण गेले ॥ ५३ ॥ तेव्हां त्या समर्थ मयासुरानें एक सुवर्णाचें, एक रुप्याचें आणि एक लोखंडाचें, अशीं तीन पुरें खड्गबाणादि युद्धसामुग्रीसह उत्पन्न करून त्यांना दिलीं. ह्या पुरांची अशी योग्यता होती कीं, त्यांचें चलनवलन कोणासच दिसत नसे ॥ ५४ ॥ हे राजा, त्या पुरांच्या साहयांनीं त्या असुरांचे सेनापति कोणालाहि न दिसतां पूर्वीचें वैर स्मरून लोकपालांसह तिन्ही लोकांचा नाश करण्यास प्रवृत्त झाले ॥ ५५ ॥ तेव्हां इंद्रादि

लोकपालांसह सर्व लोक श्रीरुद्राजवळ जाऊन म्हणाले,—' हे सर्वव्यापक देवा, ज्यांना तीन नगररूपी स्थानें मिळालीं आहेत अशा त्या असुरांनीं आम्हांला नष्टप्राय केलें आहे. आम्ही तुझे म्हणवितों, आमचें तूं रक्षण कर. ॥ ५६ ॥ त्या वेळीं त्या रुद्रानें ' भिऊं नको, असें आश्वासन देऊन पाशुपतास्त्रानें अभिमंत्रित केलेला बाण धनुष्याला लावून त्या पुरांवर सोडिला ॥ ५७ ॥ तेव्हां ज्याप्रमाणें सूर्यमंडळापासून किरणसमूह उत्पन्न होतात त्याप्रमाणें त्या बाणापासून अग्नीसारखे असंख्य बाण उत्पन्न झाले, व त्यायोगे तीं पुरें नष्टप्राय झालीं ॥ ५८ ॥ त्या बाणांचा स्पर्श होता क्षणींच पुरांमध्यें राहणारे सर्व असुर गतप्राण होऊन पडले. त्या वेळीं महामायावी मयासुरानें गतप्राण झालेल्या त्या असुरांना उचलून स्वतः उत्पन्न केलेल्या अमृताच्या विहिरींत टाकिलें ॥ ५९ ॥ अमृतरसाचा स्पर्श होतांच ते असुर वज्रासारखे दृढशरीरी व महाबलवान् होऊन मेघांचें विदारण करणाऱ्या विद्युद्रूप अग्नीप्रमाणें एकदम उठले ॥ ६० ॥ तेव्हां आपला संकल्प व्यर्थ गेला असें पाहून श्रीरुद्र चिंताग्रस्त झाले. त्या वेळीं शंकर खिन्न झालेले पाहून ह्या भगवान् विष्णूनें त्या अमृतरसाच्या नाशाचा उपाय योजिला ॥ ६१ ॥ लगेच ब्रह्मदेव वत्स झाला व हा विष्णु स्वतः गाय झाला आणि मध्याह्नकाळीं त्रिपुरासुरांच्या अमृतरसकूपाजवळ जाऊन त्यांनीं त्यांतील अमृत पिऊन टाकिलें ॥ ६२ ॥ पण तेथील रक्षक असुरांनीं अमृतप्राशन करणाऱ्या गाईला पाहिलें असतांहि तिचें निवारण केलें नाहीं. कारण, ते भगवंताच्या मायेनें मोहित झाले होते. गाईनें अमृत प्राशन केलेलें जाणून स्वतः शोकरहित असा तो महामायावी मयासुर भगवंताच्या अतर्क्य गतीचें स्मरण करून त्या शोक करणाऱ्या असुरांना म्हणाला,—अहो, देव, मनुष्य, असुर अथवा इतरहि कोणी यक्षगंधर्वादिक असला तरी तो या लोकीं आपणाला, दुसऱ्याला अथवा उभयतांनाहि दैवानें जें प्राप्त झालें असेल, त्याचा परिहार करण्यास समर्थ नाहीं, असो. नंतर ह्या विष्णूनें धर्म, ज्ञान, वैराग्य, तप, विद्या आणि कृपा इत्यादि आपल्या शक्तीच्या योगानें शंकराला रथ, सारथी, ध्वज, अश्व, धनुष्य, कवच व बाण अशी सर्व युद्धसामुग्री निर्माण करून दिली ॥ ६३ ॥ ६४॥६५ ॥ नंतर युद्धार्थ सिद्ध झालेल्या भगवान् ईश्वरानें रथारूढ होऊन, धनुष्य व बाण हस्तामध्यें धारण केलें आणि हे राजा, मध्यान्हसमयीं धनुष्याला बाण लावून त्याच्या योगानें दुर्भेद्य अशीं तीं तीनहि पुरें दग्ध करून टाकिलीं. त्या काळीं स्वर्गामध्यें दुंदुभि वाजूं लागल्या, शेंकडों विमानांत बसून आकाशांत एकत्र झालेले देव, ऋषि, पितर आणि सिद्धाधिपति हे जयजयकार करून पुष्पांची वृष्टि करूं लागले आणि अप्सरांचे गण आनंदित होऊन गायन व नृत्य करूं लागले ॥ ६६ ॥ ६७ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें भगवान् त्रिपुरारीनें तीनहि पुरें दग्ध करून ब्रह्मादिक देव स्तुति करीत असतां आपल्या स्थानीं गमन केलें ॥ ६८ ॥ हे धर्मराजा, आपल्या मायेनें नरदेहाचें अनुकरण करणाऱ्या ह्या जगद्गुरु श्रीहरीचीं सर्व लोकांस पवित्र करणारीं ह्या प्रकारचीं चरित्रें ऋषींनीं वर्णन केलीं आहेत. आतां तुला आणखी विशेष काय सांगूं ? ॥ ६९ ॥

**दहावा अध्याय समाप्त**

# अध्याय ११ वा

शुक्राचार्य म्हणाले,—हे परीक्षित्राजा, ज्याचें मन भगवंताच्या ठिकाणीं लागलेलें आहे, अशा त्या लोकांमध्येंहि श्रेष्ठ अशा दैत्यराज प्रल्हादाचें साधूंच्या सभांमध्यें सत्कार केलेलें चरित्र श्रवण करून आनंदित झालेल्या युधिष्ठिरानें पुनः त्या ब्रह्मपुत्र नारदाला प्रश्न केला ॥ १ ॥

युधिष्ठिर म्हणाला,—हे भगवन्, ज्यापासून पुरुषाला ज्ञान व भक्ति हीं प्राप्त होतात, तो वर्ण व आश्रम ह्यांच्या आचारांनीं युक्त असा मनुष्यांचा सनातन धर्म श्रवण करण्याची मी इच्छा करितों ॥ २ ॥ हे ब्रह्मनिष्ठ ऋषे, साक्षात् प्रजापति ब्रह्मदेवाचे तुम्ही पुत्र असून तप, योग आणि समाधि ह्यांच्या योगानें त्या सर्व पुत्रांमध्यें श्रेष्ठ आहां ॥ ३ ॥ हे भगवन्, ज्यांचें नारायण हेंच मुख्य दैवत आहे, असे आपणांसारखे दयाळू, सदाचारसंपन्न आणि शांत असे ब्राह्मण हा सर्वोत्कृष्ट गुह्य असा धर्म जसा जाणतात, तसा इतर कोणी जाणत नाहींत ॥ ४ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, सर्व लोकांच्या धर्माला आधारभूत असा जो जन्मादिविकारशून्य भगवान् नारायण त्याला नमस्कार करून त्याच्या मुखापासून श्रवण केलेला सनातनधर्म मी तुला सांगतों ॥ ५ ॥ लोकांच्या कल्याणाकरितां तो नारायणऋषि आपल्या नरनामक अंशासह बदरिकाश्रमामध्यें तप करीत आहे ॥ ६ ॥ हे राजा, सर्वदेवतारूप असा भगवान् श्रीहरि, तज्ज्ञांची स्मृति व ज्यांच्या योगानें मन संतुष्ट होतें तें सदाचरण हीं धर्माचीं मुख्य प्रमाणें होत ॥ ७ ॥ हे राजा पंडुपुत्रा, सत्य, दया, तप, शुद्धता, सहनशीलता, युक्तायुक्तविवेक, मनोनिग्रह, बाह्येन्द्रियदमन, अहिंसा, ब्रह्मचर्य, दान, योग्य मंत्राचा जप, सरळपणा, संतोष, सर्वत्र समदृष्टि ठेवणाऱ्या महात्म्यांची सेवा, प्रवृत्तिकर्मापासून हळूहळू निवृत्ति करून निष्फळ कर्माचें होणारें निष्फळ फळ अवलोकन करणें, व्यर्थ भाषणांपासून निवृत्त होणें, आत्मविचार करणें, सर्व भूतांना योग्य रीतीनें अन्नादिकांचा वांटा वांटून देणें, सर्व ठिकाणीं आणि विशेषतः मनुष्यांच्या ठिकाणीं आत्मबुद्धि व देवताबुद्धि धारण करणें, तसेंच महात्म्यांना आश्रयभूत अशा ह्या श्रीकृष्णाचें कीर्तन, श्रवण, स्मरण, सेवन, अर्चन, नमन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन करणें, याप्रमाणें तीस लक्षणांनीं युक्त असा हा सर्व मानवांचा उत्कृष्ट धर्म ऋषींनीं सांगितला आहे. त्याच्या योगानें सर्वात्मा भगवान् प्रसन्न होतो. ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥ हे राजा, ज्याच्या ठिकाणीं गर्भाधानादि संस्कार मंत्रयुक्त व अविच्छिन्नरीतीनें झाले आहेत व ब्रह्मदेवानें ज्याला संस्कारानें युक्त

असें म्हटलें आहे, तोच द्विज होय. जन्मानें व आचारानें शुद्ध असलेल्या द्विजांना म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना यजन, अध्ययन व दान हीं कर्मे सांगितलीं आहेत व ब्रह्मचर्यादिक आश्रमांचीं कर्मेंहि सांगितलीं आहेत ॥ १३ ॥ हे राजा, अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान आणि प्रतिग्रह हीं सहा कर्मे ब्राह्मणाला विहित असून त्यांपैकीं अध्यापन, याजन आणि प्रतिग्रह हीं उपजीविकेसाठीं आहेत. प्रजापालन करणाऱ्या राजानें ब्राह्मणांशिवाय इतरांकडून कर वगैरे घेऊन उपजीविका करावी असें सांगितलें आहे ॥ १४ ॥ तसेंच वैश्यानें सर्वदा ब्राह्मणाला अनुकूल राहून कृषिकर्म, व्यापार, गोरक्षण आणि व्याजबट्टा ह्यांच्यावर उपजीविका चालवावी. शूद्रानें द्विजशुश्रूषा करावी. स्वामीची सेवा करणें हेंच त्याच्या उपजीविकेचें साधन होय ॥ १५ ॥ हे राजा, कृषिकर्मादि अनेक धंदे, अयाचित दानांचा स्वीकार, प्रत्यक्ष धान्याची भिक्षा आणि शेतें व बाजार येथें पडलेले दाणे टिपणें, ही चार प्रकारची वृत्ति ब्राह्मणाला विहित असून त्यांपैकीं पहिल्यापेक्षां पुढली वृत्ति अनुक्रमानें श्रेष्ठ आहे ॥ १६ ॥ हे राजा, कनिष्ठ वर्णाच्या पुरुषानें केव्हांहि आपत्कालावांचून श्रेष्ठ वर्णाला विहित अशा वृत्तीचा स्वीकार करूं नये; पण आपत्कालीं क्षत्रियावांचून सर्वांना सर्व वृत्ति विहित आहेत. क्षत्रियानें मात्र आपत्कालींहि प्रतिग्रहावांचून इतर वृत्तींचाच स्वीकार करावा. ॥ १७ ॥ हे धर्मराजा, मनुष्यानें ऋत, अमृत, मृत, प्रमृत आणि सत्यानृत ह्यांतील कोणत्याहि वृत्तीनें उपजीविका करावी; परंतु कसाहि प्रसंग आला तरी श्ववृत्तीनें कधींहि निर्वाह करूं नये ॥ १८ ॥ हे राजा, ऋत म्हणजे शेतांतील व बाजारांतील दाणे टिपणें, अमृत म्हणजे आयाचित दानांचा स्वीकार, मृत म्हणजे नित्य याचना, प्रमृत म्हणजे कृषिकर्म, सत्यानृत म्हणजे व्यापार व श्ववृत्ति म्हणजे नीचाची चाकरी असें सांगितलें आहे. असो. ती श्ववृत्ति निंद्य असल्यामुळें ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं वर्ज्य करावी; कारण ब्राह्मण हा सर्व वेदमय आहे. व राजा हा सर्व देवमय आहे ॥ १९ ॥ २० ॥ हे राजा, मनःसंयमन, बाह्येंद्रियदमन, तप, शुद्धत्व संतोष, क्षमा, मनाची सरलता, विवेक, दया, भगवंतावर निष्ठा आणि सत्य हें ब्राह्मणाचें लक्षण होय. तसेंच शौर्य, प्रभाव, धैर्य, तेज औदार्य, मनोनिग्रह, क्षमा, ब्राह्मणांविषयीं भक्ति, अनुग्रह आणि प्रजापालन हें क्षत्रियांचें लक्षण असून देव. गुरु आणि भगवान् अच्युत त्यांच्या ठिकाणीं भक्ति, धर्म, अर्थ व काम ह्या तीन पुरुषार्थांचें साधन, आस्तिक्य, नित्य उद्योग आणि चातुर्य हें वैश्यांचें लक्षण आहे. आणि नम्रता, स्नानादिकानें शुद्ध राहणें, निष्कपटभावानें स्वामीची सेवा, अमंत्रक यज्ञ, चौर्य न करणें, सत्य भाषण करणें आणि गोब्राह्मणांचें रक्षण करणें हें शूद्रांचें लक्षण होय ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ २४ ॥ हे राजा, पतिशुश्रूषा करणें, त्याला अनुकूल असें वागणें, त्याच्या बंधूंच्या हिताचें आचरण करणें आणि पतीचा जो नियम असेल त्याचेंच आपण आचारण करणें, हें पतिव्रतास्त्रियांचें लक्षण असून तोच त्यांचा धर्महि आहे ॥ २५ ॥ पतिव्रता स्त्रीनें घराची झाडसारव करावी, त्यामध्यें रांगोळ्या घालून तें सुशोभित करावें, स्वतः सौभाग्यादिक अलंकारांनीं भूषित असावें, घरांतील भांडींकुंडीं आणि लहानमोठे पदार्थ स्वच्छ ठेवावे. विनय, इंद्रियनिग्रह,

सत्य व प्रिय शद्ब आणि प्रेम ह्यांच्या योगानें योग्य काळीं पतीची सेवा करावी ॥ २६ ॥ ॥ २७ ॥ त्याचप्रमाणें दैवानें झालेल्या लाभानें संतुष्ट, विषयभोगाविषयीं अनासक्त. असावें; संसारांत दक्ष, धर्मप्रिय, सत्य भाषण करणारी, सर्वत्र सावध, शुद्ध आणि प्रेमळ राहून स्त्रीनें महापातकरहित अशा आपल्या पतीची सेवा करावी ॥ २८ ॥ पति हेंच मुख्य दैवत आहे असें मानून जी स्त्री श्रीहरीच्या सेवेविषयीं तत्पर असलेल्या लक्ष्मीप्रमाणें हरिभावनेनें पतीची सेवा करिते ती वैकुंठामध्यें लक्ष्मीप्रमाणें आपल्या पतीसह आनंदाचा उपभोग घेते ॥ २९ ॥ हे राजा, चौर्यकर्मरहित असलेले चर्मकारादि अंत्यज व पुल्कसादिक अंतेवसायी जे लोक आहेत, त्यांना कुलपंरपेरनें प्राप्त झालेली वस्त्रक्षालनादिक वृत्ति योग्य होय ॥ ३० ॥ निरनिराळ्या युगांमध्यें सत्त्वादिगुणांना अनुसरून ज्या पुरुषांना जो धर्म विहित असेल तोच त्यांना बहुतकरून इहलोकीं आणि परलोकीं सुखाला कारण होतो असें सांगितलें आहे ॥ ३१ ॥ स्वाभाविक वृत्तीनें स्वकर्माचरण करून राहणारा पुरुष पुढें हळूहळू त्या स्वाभाविक कर्मांचा त्याग करून निर्गुणावस्थेला पावतो ॥ ३२ ॥ हे राजा, दरसाल पेरणी होत असलेलें शेत जसें कांहीं काळानें निःसत्त्व होऊन धान्य उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं व त्यामध्यें पेरलेलें बीजहि जसें नाहींसें होतें त्याप्रमाणेंच वासनारूपानें मनामध्यें विषय वास करीत असल्यामुळें त्याची स्थिति होते. जसा प्रज्वलित झालेला अग्नि घृताच्या बिंदूंनीं शांत होत नाहीं, पण मोठ्या धारेनें मात्र विझून जातो, त्याप्रमाणें विषयांच्या अतिभोगानें त्याविषयीं चित्त विरक्त होतें ॥ ३३ ॥ ३४ ॥ हे धर्मराजा, ज्या पुरुषाचें जें वर्णबोधक लक्षण सांगितलें आहे, तें लक्षण इतर वर्णांच्या पुरुषांच्या ठिकाणीं जर दृष्टीस पडेल तर तो अन्य वर्णांतील पुरुषहि त्या लक्षणाच्या निमित्तानें त्या वर्णांतील आहे असें समजावें. केवळ जातीमुळेंच तो त्या वर्णांतील आहे असें समजूं नये ॥ ३५ ॥

## अकरावा अध्याय समाप्त

# अध्याय १२ वा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, गुरूच्या घरीं वास करणाऱ्या ब्रह्मचाऱ्यानें इंद्रियदमन करून व आपली योग्यता दासाप्रमाणें खालच्या दर्जाची आहे असें मानून गुरूची शुश्रूषा करावी आणि त्याच्यावर अत्यंत दृढ प्रेम धरावें ॥ १ ॥ सायंकाळीं व प्रातःकाळीं गुरु, अग्नि, सूर्य आणि देवश्रेष्ठ जो विष्णु त्याचें पूजन करावें व मौन धारण करून एकाग्र अंतःकरणपूर्वक दोन्ही संध्यांच्या वेळीं गायत्रीचा जप करावा ॥ २ ॥ गुरु बोलावतील त्या वेळीं हजर राहून सावधानतेनें वेदाध्ययन करावें व अध्ययनाच्या आरंभीं आणि शेवटीं गुरूचे चरणावर मस्तक ठेवून नमस्कार करावा ॥ ३ ॥ हस्तामध्यें दर्भ धारण करून मेखला, कृष्णाजिन, वस्त्र, जटा, दंड, कमंडलु आणि यज्ञोपवीत हीं यथोक्तरीतीनें धारण करावीं ॥ ४ ॥ सकाळीं व संध्याकाळीं भिक्षा मागून ती गुरूला अर्पण करावी आणि त्यानें आज्ञा दिली तर भोजन करावें, व न दिली तर उपवास करावा ॥ ५ ॥ सुशील, मिताहारी, श्रद्धायुक्त आणि जितेन्द्रिय राहावें आणि स्त्रिया व स्त्रैण पुरुष ह्यांच्याशीं भिक्षा मिळेपर्यंतच व्यवहार ठेवावा ॥ ६ ॥ गृहस्थाव्यतिरिक्त ब्रह्मचाऱ्यानें स्त्रियांच्या कथा वर्ज्य कराव्या; कारण इंद्रियें बलवत्तर असून तीं जितेन्द्रिय पुरुषाचेंहि मन बलात्कारानें हरण करितात ॥ ७ ॥ तरुण पुरुषानें आपले केस विंचरणें, शरिराचें मर्दन करणें व अभ्यंगस्नान करणें, हीं कधींहि तरुण स्त्रियांकडून करवूं नयेत ॥ ८ ॥ कारण, स्त्री ही खरोखर अग्निरूप असून पुरुष घृतकुंभरूप आहे. यास्तव एकांतामध्यें प्रत्यक्ष कन्येशींहि संभाषणादि व्यवहार करूं नये व इतर प्रसंगींही कारणापुरतें त्यांच्याशीं भाषण करावें ॥ ९ ॥ हे धर्मराजा, स्वरूपसाक्षात्काराच्या योगानें देह व इंद्रियें इत्यादि सर्व भ्रममूलक आहेत, असा निश्चय करून जोंपर्यंत हा जीव स्वतंत्र झाला नाहीं, तोंपर्यंत हा पुरुष व ही स्त्री इत्यादि भेदबुद्धि नाहींशी होत नाहीं. भेदबुद्धीमुळें विषयचिंतन होतें व विषयचिंतनानें जीवाला उपभोग करण्याची बुद्धि उत्पन्न होते. ह्याकरितां त्यांचा त्यागच केला पाहिजे ॥ १० ॥ असो. सहाव्या श्लोकापासून सांगितलेले हे धर्म, गृहस्थांना व यतीलाहि विहित आहेत; परंतु कुटुंबवत्सल—( रजोदर्शन झाल्यापासून जो सोळा दिवसांचा ऋतुकाळ त्या काळांत होणाऱ्या स्त्रीसमागमानें झालेल्या पुत्रादिकांच्या रक्षणाविषयीं व्यग्र असलेल्या ) गृहस्थानें मात्र सामर्थ्य असल्यास गुरूची उपजीविका चालवावी नाहीं तर चालवूं नये ॥ ११ ॥ त्याप्रमाणें ज्यांनीं ब्रह्मचर्यव्रत ग्रहण केलें असेल त्यांनीं मस्तकाला तेल लावणें, न्हाणें, शरीरमर्दन करणें, स्त्रीकडून सेवा घेणें, स्त्रियांचीं चित्रें वगैरे काढणें, मांस व मद्य ह्यांचें सेवन करणें, पुष्पमाळा घालणें, चंदनाची उटी लावणें आणि शरिरावर अलंकार घालणें हीं वर्ज्य करावींत॥ १२॥ ह्याप्रमाणें, द्विजानें गुरुगृहीं वास करून स्वाधिकारानुरूप यथाशक्ति शिक्षादि अंगें व उपनिषदें यांसह वेदत्रयीचें अध्ययन करावें व त्यांच्या अर्थाचा विचार करावा ॥१३॥

नंतर जर सामर्थ्य असेल तर गुरूला अभीष्ट अशी देणगी देऊन त्यानें आज्ञा दिल्यावर गृहस्थाश्रम किंवा वानप्रस्थाश्रम स्वीकारावा किंवा नैष्ठिक ब्रह्मचारी होऊन गुरुगृहींच वास करावा ॥ १४ ॥ अग्नि, गुरु, आत्मा व सर्व भूतें ह्यांच्या ठिकाणीं जरी वस्तुतः इंद्रियातीत भगवान् प्रविष्ट नाहीं, तथापि आपल्या आश्रयानें असलेल्या जीवांसह त्यामध्यें तो व्यापकरूपानें प्रविष्ट आहे असें पाहावें ॥ १५ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें आचरण करणारा ब्रह्मचारी, वानप्रस्थ यति अथवा गृहस्थ अपरोक्षज्ञानसंपन्न होऊन परब्रह्मस्वरूप पावतो ॥ १६ ॥ आतां ऋषींनीं सांगितलेले वानप्रस्थाचे धर्म मी सांगतों. हे धर्म या लोकीं आचरणारा मुनि अनायासानें महर्लोकाला जातो ॥ १७ ॥ हे राजा, वानप्रस्थाश्रमी पुरुषानें नांगरलेल्या जमिनीपासून उत्पन्न झालेलें धान्य भक्षण करूं नये. तसेंच नांगरलेल्या जमिनीमध्यें उत्पन्न झालेलें व योग्य काळापूर्वीच परिपक्व झालेलें फळमूळादिकहि भक्षण करूं नये. अग्नीवर शिजविलेले किंवा कच्चे अथवा केवळ सूर्यकिरणांनीं परिपक्व झालेले असे फळादिक पदार्थ भक्षण करावे ॥ १८ ॥ त्यानें वनांतील तांदूळ आदिकरून धान्यांचेच चरुपुरोडाश ज्या वेळीं जसे घ्यावयास सांगितले असतील तसे घेऊन अग्नीला अर्पण करावे व नवें अन्न प्राप्त झालें असतां पूर्वीचें टाकून द्यावें ॥ १९ ॥ केवळ अग्निसंरक्षणार्थच पर्णकुटिकेचा अथवा पर्वतगुहेचा आश्रय करावा व स्वतः थंडी, वारा, अग्नि, पर्जन्य आणि सूर्याचा ताप हे सहन करावे ॥ २० ॥ जटा, अंगावरील केस, मळ, दाढी, मिशा वाढवून, दंड, कमंडलु, कृष्णाजिन, वल्कलें आणि अग्निसाहित्य धारण करणाऱ्या जटाधारी मुनीनें तपाच्या क्लेशानें बुद्धीचा नाश न होईल अशा रीतीनें बारा, आठ, चार, दोन अथवा एक संवत्सरपर्यंत वानप्रस्थधर्माचें आचारण करावें ॥ २१ ॥ २२ ॥ परंतु व्याधीनें अथवा जरेच्या योगानें आपलें नित्यकर्म अथवा ज्ञानाभ्यास करण्यास जेव्हां तो असमर्थ होईल, तेव्हां त्यानें निरशनादि नियम धरावे ॥ २३ ॥ हे धर्मराजा, प्रथम त्यानें आपल्या ठिकाणीं अग्नीचा समारोप करून देहादिकांविषयींचा अहंकार व ममत्वबुद्धि यांचा त्याग करावा आणि आपल्या देहाला कारणभूत अशा पंचमहाभूतांमध्यें यथायोग्य रीतीनें देहाचा लय करावा ॥ २४ ॥ तसेंच आकाशामध्यें देहगत छिद्रांचा, वायूमध्यें प्राणांचा, तेजांत उष्णतेचा, जलांत रक्त, श्लेष्मा व पू ह्यांचा व पृथ्वीमध्यें अवशिष्ट राहिलेल्या अस्थिमांसादि कठिण अंशांचा, उत्पत्तीच्याच धोरणानें बुद्धिमान् पुरुषानें लय करावा ॥ २५ ॥ त्याचप्रमाणें भाषणासह वागिंद्रियांचा अग्निदेवतेंत लय करावा, ग्रहणादि व्यापारांसह हस्तांचा इंद्रदेवतेंत, गतीसह पायांचा विष्णुदेवतेमध्यें, रतीसह उपस्थेंद्रियाचा प्रजापतिदेवतेंत, पुरुषोत्सर्गासह गुदेन्द्रियाचा मृत्युदेवतेमध्यें, शब्दांसह श्रोत्रेंद्रियांचा दिशांमध्यें आणि स्पर्शासह त्वगिन्द्रियांचा वायूंत अशा प्रकारें प्रत्येकाचा मूळ कारणांत लय करावा ॥ २६ ॥ २७ ॥ तसेंच, हे राजा, चक्षुरिंद्रियासह रूपाचा सूर्यांत लय करावा, वरुणासह रसनेंद्रियाचा रसरूप उदकांत लय करावा आणि अश्विनीकुमारांसह घ्राणेंद्रियाचा गंधयुक्त पृथ्वीच्या ठिकाणीं लय करावा ॥ २८ ॥ त्याचप्रमाणें मनोरथांसह मनाचा चंद्राच्या ठिकाणीं, ज्ञानविषयांसह बुद्धीचा ब्रह्मदेवामध्यें लय करावा व ज्यामुळें मीपणा व माझेपणा

इत्यादि क्रिया होतात त्या अहंकारासह कर्मांचा रुद्रांत लय करावा. चेतनेसह चित्ताचा जिवाच्या ठिकाणीं लय करावा व गुणांसह अहंकाराला निर्विकार अशा परब्रह्मांत लीन करावें ॥२९॥ पृथ्वीचा जलांत, जलाचा तेजांत, तेजाचा वायूंत, वायूचा आकाशांत, आकाशाचा अहंकारांत, अहंकाराचा महत्तत्त्वांत, महत्तत्त्वाचा मायेमध्यें आणि त्या मायेचा परमात्म्यांत लय करावा ॥ ३० ॥ ह्याप्रमाणें सर्व उपाधींचा लय झाल्यानंतर अवशिष्ट राहिलेला चिद्रूप आत्मा अविनाशी आहे असें जाणून, ज्याप्रमाणें काष्ठरूप उपाधि दग्ध झाली असतां अग्नीचा दाहरूप व्यापार थांबतो, त्याप्रमाणें वानप्रस्थानें अद्वैतस्वरूपी होऊन सर्व उपाधींपासून विराम पावावें ॥ ३१ ॥

## बारावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १३ वा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, वानप्रस्थ धर्म आचरण्यास आणि आत्मविचाराचा अभ्यास करण्यास जो असमर्थ असेल त्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें अग्निसमारोपाची भावना करून निरशनादिक व्रत स्वीकारावें; पण जो समर्थ असेल त्यानें संन्यास घेऊन, देहमात्र शिल्लक ठेवून इतर सर्वांचा विधिपूर्वक त्याग करावा आणि कशाचीहि अपेक्षा न धरितां प्रत्येक गांवामध्यें एकच रात्र राहून पृथ्वीवर संचार करीत असावें ॥१॥ वस्त्र धारण करावयाचें असेलच तर केवळ लंगोटी मात्र त्यानें धारण करावी आणि दंडादि जीं संन्यासचिन्हें त्यांशिवाय इतर कोणत्याहि त्याग केलेल्या वस्तूंचा आपत्तिकालवांचून स्वीकार करूं नये ॥२॥ 'नारायण' हाच आपल्याला श्रेष्ठ आहे असें मानून भिक्षूनें सर्व प्राण्यांचें हितचिंतन करीत असावें आणि स्वस्वरूपींच रममाण होऊन त्यानें कोणाचाहि आश्रय न घेतां एकट्यानेंच संचार करावा ॥ ३ ॥ कार्यकारणांहून श्रेष्ठ अशा अविनाशी आत्म्याच्या ठिकाणीं हें विश्व कल्पित आहे व कार्यकारणात्मक प्रपंचामध्यें सर्व ठिकाणीं परमात्माच आहे, असें पाहावें ॥४॥ हे राजा, सुषुप्ति अवस्थेमध्यें आत्मतत्त्व तमोगुणानें व्याप्त असतें, जाग्रत व स्वप्न ह्या अवस्थांमध्यें विक्षेपयुक्त असतें व संधिकालामध्यें मात्र तमोगुण व विक्षेप हीं दोन्ही असतात. म्हणून निद्रेच्या आरंभीं व जाग्रदावस्थेच्या अंतीं आत्मस्वरूपाकडे लक्ष लावून असणाऱ्या यतीनें आत्मतत्त्व पाहात राहून बंध व मोक्ष हे वस्तुतः खरे नसून केवळ अविद्येनें कल्पिलेले आहेत असें मानावें आणि सर्व ठिकाणीं परब्रह्मस्वरूपी आत्म्याला अवलोकन करावें ॥ ५ ॥ त्याप्रमाणेंच देहाला निश्चित असलेला मृत्यु व अनिश्चित असलेलें वांचणें ह्यांकडे मुळींच लक्ष्य न देतां, भूतांची उत्पत्ति व लय हीं ज्यापासून होतात त्या काळाचीच केवळ प्रतीक्षा करीत असावें ॥ ६ ॥ तसेंच यतीनें आत्मवस्तूचें प्रतिपादन न करणारीं जीं शास्त्रें, त्यांच्या ठिकाणीं आसक्त होऊं नये.खोट्या शास्त्राच्या ठिकाणीं आसक्ति ठेवून त्यांवर उपजीविका करूं नये, वितंडादि वादामध्यें पर्यवसान होणाऱ्या तर्कांचा त्याग करावा आणि दुराग्रहानें वादीप्रतिवादींमध्यें कोणत्याहि पक्षाचा अवलंब करूं नये ॥ ७ ॥ त्याचप्रमाणें लोभ वगैरे दाखवून बलात्कारानें शिष्य गोळा करूं नयेत, भाराभर ग्रंथांचा अभ्यास करूं नये, ग्रंथावर टीका करूं नये, प्रवचनावर निर्वाह करूं नये आणि कोणत्याहि ठिकाणीं मठादिक बांधण्याच्या खटपटींत पडूं नये. ॥ ८ ॥ हे राजा, शांत व समचित्त अशा महात्म्या यतीचा आश्रम प्रायशः व्यावहारिक धर्माचरणासाठीं नाहीं. यास्तव दंडादि आश्रमचिन्हें त्यानें वाटेल तर लोकसंग्रहार्थ धारण करावींत किंवा त्यांचा त्याग करावा ॥ ९ ॥ यतीनें नेहमीं आत्मस्वरूपीं तल्लीन असावें; परंतु लोकदृष्ट्या आपलें वर्तन उन्मत्तासारखें अथवा बालकासारखें किंवा मुक्यासारखें ठेवावें ॥१०॥ हे धर्मराजा, याविषयीं प्रल्हाद आणि अजगरवृत्तीनें वागणारा एक मुनि ह्यांचा संवादरूप एक पुरातन इतिहास दृष्टांतरूपानें ज्ञानी

लोक सांगत असतात ॥ ११ ॥ एका वेळीं भगवत्प्रिय प्रल्हाद लोकतत्त्व जाणण्याच्या इच्छेनें कांहीं अमात्यांसह लोकांमध्यें संचार करीत असतां त्यानें कावेरीनदीच्या तीरीं, सह्याद्रि पर्वताच्या शिखरावर धुळीनें मलिन झालेल्या अवयवांमुळें ज्याचें निर्मळ तेज अगदीं झांकून गेलें आहे, अशा भूमीवर निजलेल्या अजगरमुनीला पाहिलें ॥ १२ ॥ १३ ॥ कर्म, स्वरूप, भाषण आणि आश्रम इत्यादि चिन्हें लुप्तप्राय झाल्यामुळें ज्याची ओळख बुजाली आहे, अशा त्या मुनीला पाहतांच त्या भगवद्भक्त प्रल्हादानें नमस्कार करून त्याची षोडशोपचारें पूजा केली आणि त्याच्या चरणांवर मस्तक ठेवून तो म्हणाला ॥१४॥१५ ॥ हे ब्रह्मनिष्ठा, उद्योगी व विषयभोग भोगणाऱ्या पुरुषांप्रमाणें तूं पुष्ट देह धारण करितोस ह्याचें कारण काय ? हे भगवन्, उद्योगी पुरुषांनाच द्रव्य प्राप्त होतें, द्रव्यवानांनाच भोग प्राप्त होतो, व उपभोग घेणाराचाच देह पुष्ट होतो, इतरत्र होत नाहीं हें प्रसिद्ध आहे ॥ १६ ॥ हे ब्रह्मनिष्ठा, उद्योग न करितां शयन करणाऱ्या तुझ्याजवळ निःसंशय द्रव्य नाहीं. अर्थात् तूं विषयभोगरहित असतां तुझा देह पुष्ट आहे ! यास्तव हे विप्रा, तूं भोगरहित असूनहि हा तुझा देह पुष्ट असण्याचें कारण काय ? हें आम्हांला सांगण्यासारखें असेल तर कृपा करून सांगा ॥ १७ ॥ हे भगवन्, तूं विद्वान्, दक्ष व चतुर आहेस. लोकांचें मनरंजन करणाऱ्या चमत्कारिक कथाहि तुझ्याजवळ आहेत. लोक द्रव्योपार्जनादि कर्मे करीत आहेत तें सर्व तूं जाणत आहेस. असें असतां उदासीन वृत्ति धारण करून उगीच शयन करतोस ह्याचें कारण काय ? ॥ १८ ॥

नारद म्हणाला,–हे धर्मराजा, दैत्याधिपति प्रल्हादानें ह्याप्रमाणें प्रश्न केला असतां त्याच्या अमृतासारख्या भाषणानें संतुष्ट होऊन तो महामुनि हास्यवदनानें प्रल्हादाला उत्तर देऊं लागला. ॥ १९ ॥

ब्राह्मण म्हणाला,—हे असुरश्रेष्ठा, तूं ज्ञानी पुरुषांना मान्य असून पुरुषाच्या प्रवृत्ति-निवृत्तिवृत्तींचीं फळें काय आहेत हें खरोखर अंतर्दृष्टीनें जाणत आहेस ॥ २० ॥ सूर्य जसा अंधःकाराचा नाश करितो, त्याप्रमाणें भगवान् नारायण, एकनिष्ठ भक्तीच्या योगानें तुझ्या हृदयामध्यें वास करीत असल्यानें तुझ्या अज्ञानाचा नाश झाला आहे ॥ २१ ॥ तथापि हे राजा, तुझ्या प्रश्नांचीं आम्ही यथामति उत्तरें देतों. कारण, अंतःकरणाची शुद्धि होण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांना तूं मान्य आहेस ॥२२॥ हे राजा, कितीहि विषयभोग सेविले तरी सुद्धां पूर्ण न होणाऱ्या व जन्मप्रवाह उत्पन्न करणाऱ्या तृष्णेनें मला पूर्वीं कर्मे करावयास लावून नाना प्रकारच्या योनींमध्यें टाकिलें होतें ॥ २३ ॥ तेव्हां कर्माच्या योगानें नाना प्रकारच्या योनींमध्यें फिरत असणारा मी भगवदिच्छेनें धर्माच्या योगानें स्वर्गाचें द्वार, अधर्माच्या योगानें नरकाचें द्वार, मिश्र अशा धर्माधर्माच्या योगानें या मनुष्यलोकाचें द्वार व निवृत्तीच्या योगानें मोक्षाचें द्वार, अशा प्रकारें विविध योनींत जन्म घेऊन दैवगतीनें या मनुष्यदेहामध्यें आलों आहें ॥ २४ ॥ परंतु येथें सुखप्राप्ति व दुःखनिवृत्ति होण्या-करितां कर्मे करीत असलेल्या स्त्रीपुरुषांना मिळणारें दुःखप्राप्तिरूप विपरीत फळ अवलोकन

करून मी त्या कर्मापासून निवृत्त झालों आहें ॥ २५ ॥ हे राजा, सुख हेंच जीवाचें स्वरूप असून सर्वकर्मनिवृत्ति झाली असतां तो आपोआप प्रकाशित होतो, म्हणून मनाच्या संकल्पापासून होणारे भोग अशाश्वत आहेत असें माझें मत आहे; तेव्हां प्रारब्धकर्मानुसार भोगावे लागणारे उपभोग घेत या ठिकाणीं उद्योग न करितां मी स्वस्थ निजून राहिलों आहें ॥ २६ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें स्वतःच्या ठिकाणीं असलेला आपला पुरुषार्थ विसरून पुरुष खोट्या द्वैतरूप प्रपंचामध्यें सांपडतो आणि भयंकर अशा संसारांत पडतो ॥ २७ ॥ जला-पासूनच उत्पन्न झालेलें शेवाळ व तृण इत्यादिकांनीं झांकून गेलेल्या जलाचा त्याग करून अज्ञ मनुष्य जसा जलाच्या इच्छेनें मृगजलाकडे धांवतो, त्याप्रमाणें मानवप्राणी आत्म-स्वरूपांत असलेला पुरुषार्थ विसरून जाऊन विषयांकडे धावत असतो ॥ २८ ॥ हे राजा, देहादिकांच्या योगानें दैवाधीन असलेल्या सुखप्राप्तीची व दुःखनिवृत्तीची इच्छा धरून मनुष्य कर्में करितो; पण दैव प्रतिकूल असलें म्हणजे केलेलीं कर्में निष्फळ होतात ॥ २९ ॥ कदाचित् तीं कर्में सफल झालीं तरी त्यांच्या फळांचा उपयोग होत नाहीं; कारण आध्या-त्मिकादि दुःखांनीं त्याला सोडलेलें नसतें. त्यामुळें मरणधर्मयुक्त पुरुषाला दुःखानें संपादन केलेल्या वित्तांनीं व तन्निमित्तक विषयांनीं सुख मिळत नाहीं ॥ ३० ॥ दुःखावांचून जरी द्रव्य प्राप्त झालें, तरी त्या द्रव्यामुळेंच दुःख होत असतें. कारण, अजितेन्द्रिय व द्रव्यलोभी मनुष्य सर्वाविषयीं शंकायुक्त असतो आणि त्यामुळें त्याला गाढ निद्रा लागत नाहीं. धनाढ्य पुरुषांनाहि भयादिक दुःखें नेहमीं प्राप्त होतात, हें नित्य मी पाहत आहें॥३१॥ वांचण्याची इच्छा करणाऱ्या व धनाची इच्छा करणाऱ्या पुरुषांना, राजा, चोर शत्रु, स्वजन, पशु, पक्षी, याचक व काल यांपासून व स्वतःपासूनहि नित्य भय प्राप्त होत असतें ॥ ३२ ॥ शोक, मोह, भय, क्रोध, प्रीति, धैर्य, हानि आणि श्रम इत्यादि दुःखें ज्यांच्यामुळें पुरुषांना होतात, त्या प्राणाची व त्या द्रव्याची इच्छा विवेकी पुरुषानें सोडून द्यावी ॥ ३३ ॥ ह्या लोकामध्यें मधमाशी व अजगर हे दोघे आमचे श्रेष्ठ गुरु होत. कारण त्यांच्या उपदेशानें वैराग्य व संतोष ह्यांची आम्हीं प्राप्ति करून घेतली आहे ॥ ३४ ॥ अति कष्ट करून जमविलेला मध जसा मधुमक्षिकांचा घात करून दुसराच कोणी तरी हरण करितो, त्याप्रमाणें मोठ्या कष्टानें मिळविलेलें धन त्या धनपतीचा घात करून दुसराच कोणी घेऊन जातो, ह्यास्तव सर्व विषयांपासून विरक्त राहावें हें मधुमक्षिकेपासून मी शिकलों आहें ॥ ३५ ॥ आणि कांहींएक खटपट न करितां दैवानें जें प्राप्त होईल त्याच्या योगानें संतुष्ट राहावें, हें अजगरापासून शिकलों आहें. मला कांहीं प्राप्त झालें नाहीं तरीहि मी अजगराप्रमाणें धैर्य धरून स्वस्थ निजून राहातों ॥ ३६ ॥ कधीं थोडें, कधीं पुष्कळ, कधीं स्वादिष्ट, कधीं स्वाद-रहित, कधीं बहुगुणयुक्त, कधीं गुणहीन, कधीं श्रद्धापूर्वक प्राप्त झालेलें, कधीं अपमानानें मिळालेलें आणि कधीं भोजनोत्तरहि मिळालेलें अन्न मी भक्षण करितों. मग तें दिवसा अथवा रात्रीं प्राप्त होवो. ॥ ३७ ॥ ३८ ॥ तसेंच तागाचें वस्त्र, रेशमी वस्त्र, हरणाचें कातडें, फटकूर, वल्कल अथवा दुसरें जें कांहीं प्राप्त होईल तें मी परिधान करितों. कारण, प्रारब्ध-कर्माच्या फळावर माझा विश्वास असल्यानें माझें मन संतुष्ट आहे ॥ ३९ ॥ त्याचप्रमाणें मी

कधीं भूमीवर, कधीं तृणावर, कधीं पानावर, कधीं पाषाणावर, कधीं भस्मामध्यें, तर कधीं दुसऱ्याच्या इच्छेनें राजवाड्यांतील छप्परपलंगावर अगर परांच्या गादीवरहि शयन करितों ॥ ४० ॥ तसेंच कधीं दुसऱ्याच्या इच्छेनें स्नान करतों, कधीं शरिराला उटी लावतों, कधीं वस्त्रें परिधान करितों व माळा आणि अलंकार धारण करून रथ, गज किंवा अश्व यांवर आरूढ होऊन संचार करितों, तर कधीं कधीं नग्न होऊन पिशाचाप्रमाणें हिंडत असतों, ॥ ४१ ॥ हे राजा, स्वभावत:च भिन्नभिन्न वृत्ति असलेल्या मनुष्यांची निंदा अथवा स्तुति मी मुळींच करीत नाहीं. उलट भगवान् विष्णूच्या ठिकाणीं ह्यांना सायुज्यमुक्ति प्राप्त होवो, अशी त्यांच्या कल्याणाचीच इच्छा करितों ॥ ४२ ॥ हे दैत्यश्रेष्ठा, सत्यदर्शी मुनीनें प्रथमत: मनोवृत्तीच्या ठिकाणीं जातिरूपादिक भेदांचें ऐक्य करावें. नंतर त्या मनोवृत्तीचा ज्याच्या-ठिकाणीं देहात्मबुद्धीची भ्रांति होत्ये त्या मनामध्यें, मनाचा सात्त्विक अहंकारांत, त्या अहंकाराचा महत्तत्त्वद्वारा मायेच्या ठिकाणीं आणि त्या मायेचा आत्मानुभवांत लय करावा; नंतर स्वानुभवाच्या योगानें स्वस्वरूपीं स्थित होऊन व सर्व कर्मांचा त्याग करून त्यानें विराम पावावें ॥ ४३ ॥ ४४ ॥ हे प्रल्हादा, ह्याप्रमाणें लोकशास्त्राविरुद्ध असलेलें अत्यंत गुह्य असें हें मी आपलें वृत्त तुला कथन केलें आहे, कारण तूं भगवन्निष्ठ आहेस ॥ ४५ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, ह्याप्रमाणें दैत्याधिपति प्रल्हादानें मुनीपासून परम-हंसधर्म श्रवण करून त्याची पूजा केली व त्याचा निरोप घेऊन आनंदित अंत:करणानें तो पुन: आपल्या घरीं आला ॥ ४६ ॥

**अध्याय तेरावा समाप्त**

# अध्याय १४ वा

युधिष्ठिर म्हणाला,—हे देवर्षे, गृहामध्यें ज्याचें मन आसक्त झालें आहे, असा माझ्यासारखा गृहस्थ ज्या प्रकारें अनायासानें ह्या पदवीला पावतो तो प्रकार मला कथन करा ॥ १ ॥

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, गृहस्थाश्रमी पुरुषानें गृहस्थाश्रमाला योग्य अशीं कर्मे करावीं, पण तीं साक्षात् भगवान् वासुदेवाला अर्पण होतील अशा रीतीनें करून महर्षींची सेवा करावी ॥ २ ॥ तसेंच त्यानें भगवद्भक्त पुरुषांचा समागम करून आपल्याला आवश्यक अशा कर्मानुष्ठानाच्या काळाखेरीज राहिलेल्या काळामध्यें भगवंताच्या गोड अवतारकथांचें श्रद्धापूर्वक श्रवण करावें आणि झोपेंतून उठलेला मनुष्य जसा स्वप्नामध्यें दृष्टीस पडलेल्या पुत्रादिकांविषयीं आसक्ति सोडून देतो, त्याप्रमाणें सत्संगाच्या योगानें स्वतःच वियुक्त होत असलेल्या अशा देहस्त्रीपुत्रादिकांविषयीं असलेली आसक्ति हळूहळू सोडून द्यावी ॥ ३ ॥ ४ ॥ हे राजा, विवेकी पुरुषानें देह व गृह ह्यांच्याशीं कार्यापुरताच संबंध ठेवावा आणि अंतर्दृष्टया त्या गृहादिकांविषयीं विरक्त राहून बाह्यदृष्टया मात्र त्यांवर आसक्त आहों असें दाखवून लोकांमध्यें व्यवहारी मनुष्यासारखें वागावें ॥ ५ ॥ ज्ञातिजन, मातापितरें, पुत्र, भाऊ व इष्टमित्र जें जें भाषण करितील व ज्या ज्या सत्कार्याविषयीं इच्छा करितील त्याला ममतेनें अनुमोदन द्यावें ॥ ६ ॥ हे राजा, पाऊस पडून उत्पन्न होणारें धान्य, भूमीपासून प्राप्त होणारें सुवर्णादि द्रव्य व अकस्मात् प्राप्त होणारें धन अशा तिन्हीं द्रव्यांपैकीं जीं द्रव्यें दैवानें प्राप्त होतील त्या सर्वांचा उपभोग घेऊन, ज्ञानवान् पुरुषानें पूर्वीं सांगितलेलीं कर्मे करावीं ॥ ७ ॥ कदाचित् दैवयोगानें पुष्कळ द्रव्य मिळालें तथापि त्याचा अभिमान धरूं नये. हे धर्मराजा, आपलें पोट भरण्यास जितकें अन्न लागेल तितक्यावरच देहधारी पुरुषाचें स्वामित्व आहे. त्यापेक्षां जो अधिक आसक्ति ठेवितो तो चोर होय. तो दंडास पात्र होतो ॥ ८ ॥ हे राजा, हरिण, उंट, गाढव, वानर, उंदीर, सर्प, पक्षी, माश्या इत्यादिकांना आपल्या पुत्रासमान मानावें. कारण, वास्तविक पाहूं गेलें असतां, त्यांच्यामध्यें व आपल्या पुत्रांमध्यें कितीसें अंतर आहे ? ॥ ९ ॥ गृहस्थाश्रमी पुरुषानें धर्म, अर्थ व काम ह्यांच्या प्राप्तीकरितां अति कष्ट कधीं करूं नयेत; तर दैवानें जेवढें प्राप्त झालें असेल तेवढ्यांत संतुष्ट राहून देशकालानुसार धर्मार्थकामांचें सेवन करावें ॥ १० ॥ तसेंच कुत्रीं, पतितमाणसें आणि चांडाळ ह्यांपर्यंतच्या सर्व प्राण्यांना आपल्या भोग्यवस्तु यथायोग्य रीतीनें वांटून द्याव्या व जिच्याविषयीं 'ही माझी आहे' असा मनुष्यांना अभिमान झालेला असतो, त्या आपल्या स्त्रीसंबंधानेंहि तसेंच करावें ॥ ११ ॥ हे राजा, जिच्याकरितां लोक आपले प्राण देतात व पित्याचा अथवा गुरूचा घात करण्यासहि मागे-

पुढें पाहात नाहींत, त्या स्त्रीच्या ठिकाणीं असलेला आपलेपणाचा अभिमान ज्यानें टाकिला, त्या पुरुषानें इतरांना अजिंक्य असा परमेश्वरहि निःसंशय जिंकला, असें म्हणण्यास हरकत नाहीं ॥ १२ ॥ हे राजा, कृमि, विष्ठा अथवा भस्म ह्यांतच ज्याचें शेवटीं पर्यवसान होणारें आहे असें हें तुच्छ शरीर कोणीकडे ? व त्या शरिराकरितांच जिच्यावर प्रेम असणार ती भार्या कोणीकडे ? आणि आपल्या महिम्यानें आकाशाला आच्छादित करून टाकणारा हा परमात्मा कोणीकडे ? म्हणून मनुष्यानें नेहमीं देह व स्त्री इत्यादिकांचा अभिमान सोडून आत्मप्राप्तीचाच प्रयत्न करावा ॥ १३ ॥ असो. दैवयोगानें प्राप्त झालेल्या व पंचमहायज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या अन्नादिकांनीं जो उदरपूरण करितो आणि राहिलेल्या अन्नावरील स्वामित्व टाकून देतो, तो ज्ञानी पुरुष निवृत्तिमार्गनिष्ठ अशा सत्पुरुषांच्या गतीला प्राप्त होतो ॥ १४ ॥ हे धर्मराजा, पूर्वी सांगितलेल्या यजनादि वृत्तीनें प्राप्त झालेल्या द्रव्याच्या साहाय्यानें गृहस्थाश्रमी पुरुषानें, प्रत्यहीं देव, ऋषि,मनुष्यें, भूतें आणि पितर ह्या पंच-महायज्ञांच्या देवतांचें व स्वतः आपलें व अंतर्यामी परमात्म्याचें आराधन करावें ॥ १५ ॥ जर अधिकारादिक सर्व यज्ञसंपत्ति आपणांजवळ असतील तर यज्ञप्रतिपादक ग्रंथोक्तविधीनें अग्निहोत्रादिक करून यज्ञपुरुषाचें आराधन करावें ॥ १६ ॥ परंतु यज्ञासाठीं अतिशय आग्रह धरूं नये. हे राजा, ब्राह्मणाच्या मुखामध्यें अर्पण केलेल्या अन्नादिकांनीं जशी ह्या सर्वयज्ञभोक्त्या भगवंताची तृप्ति होत्ये, तशी अग्निरूप मुखामध्यें समर्पण केलेल्या होमद्रव्यानें होत नाहीं ॥ १७ ॥ यास्तव ब्राह्मण, पंचमहायज्ञ, देवता, मनुष्य आणि पश्वादिक ह्यांच्या ठिकाणीं त्यांना त्यांना इष्ट असलेले भोग अर्पण करून अंतर्यामीं परमात्म्याचेंच तूं यथाशक्ति पूजन करीत जा व त्यांमध्येंहि ब्राह्मणानंतर इतरांचें पूजन करण्याचा क्रम ठेव ॥ १८ ॥ द्रव्यवान् द्विजानें, स्ववित्तानुसार भाद्रपद मासामध्यें मातापितरांचें व त्यांच्या बंधूंचें कृष्ण-पक्षसंबंधीं महालयनामक श्राद्ध करावें ॥ १९ ॥ त्याचप्रमाणें अयन, विषुव, व्यतीपात, दिनक्षय, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, द्वादशी, श्रवणादि तीन नक्षत्रें, वैशाख शुक्ल तृतीया, कार्तिक शुक्ल नवमी, हेमंत ऋतु व शिशिरऋतु ह्यांतील चार अष्टका, * माघ शुक्ल सप्तमी, मघा आणि संपूर्ण चंद्रानें युक्त अशी पौर्णिमा ह्यांचा योग आला असतां, तसेंच मासनांवें पाडणारीं चित्रा, विशाखा, ज्येष्ठा इत्यादि नक्षत्रांचा आणि पूर्ण चंद्र अथवा एका कलेनें न्यून चंद्र ह्यांनीं युक्त असलेल्या पौर्णिमेचा योग आला असतां, अनुराधा, श्रवण, उत्तरा, उत्तराषाढा आणि उत्तरा-भाद्रपदा ह्यांतील कोणतेही नक्षत्र द्वादशीला आलें असतां व ह्यांतील नक्षत्रांचा एकादशीच्या दिवशीं योग आला असतां आणि जन्मनक्षत्र अथवा श्रवण यांचा दिवसाचा योग आला असतां, गृहस्थाश्रमी पुरुषानें पित्रादिकांचें श्राद्ध करावें ॥२०ते२३॥ हे धर्मराजा, हे पूर्वोक्त पर्वकाळ पुण्यकारक कर्माचें अनुष्ठान करण्यास योग्य आहेत.कारण,ते स्वतः श्रेयोवर्धक आहेत म्हणून ह्या पर्वकाळीं पुरुषानें सर्व प्रयत्नानें स्नानदानादिक पुण्यकर्में केलीं असतां त्याच्या आयुष्याचें साफल्य होतें ॥२४॥ हे राजा, ह्या पर्वसमयीं स्नान, जप, होम, व्रत आणि देवब्राह्मणांचें पूजन

* अष्टका म्हणजे मार्गशीर्ष, पौष, माघ आणि फाल्गुन या महिन्यांतील वद्य अष्टम्या.

केलें असतां अथवा पितर, देव, नर आणि मूतें ह्यांना कांहीं अर्पण केलें असतां तें कर्म अक्षय्य फळ देणारें होतें ॥२५॥ हे राजा, त्याचप्रमाणें भार्येच्या पुंसवनादिक संस्कारांचा, अपत्यांच्या जातकादिक संस्कारांचा, तसाच आपल्या यज्ञदीक्षादिक संस्कारांचा काळ दहनादि यज्ञनादि प्रेतक्रिया, सांवत्सरिक श्राद्ध आणि अभ्युदयाकरितां केलेलें इतर कर्म, ह्या प्रसंगीं सुद्धा पुरुषानें तीं तीं कर्मे उत्तम प्रकारें करून पुण्य संपादन करावें॥२६॥आतां धर्मादि श्रेयस्कर देश कोणते तें तुलाकथन करितों.ज्याच्या ठिकाणीं हें संपूर्ण चराचर विश्व रचलेलें आहे, त्या भगवंताची केवळ मूर्तिच आहे असें सत्पात्र जेथें प्राप्त होईल तो देश अत्यंत पुण्यकारक होय. त्याच प्रमाणें तप, विद्या आणि दया ह्यांनीं युक्त असा ब्राह्मणांचा समुदाय जेथें असेल, तोहि देश पुण्यकारक जाणावा ॥ २७ ॥ ॥ २८ ॥ तसेंच श्रीहरीचें आराधन जेथें होत असतें तो देश पुण्यकर्माचें स्थान होय. त्याप्रमाणें पुराणामध्यें प्रख्यात असलेल्या गंगादि नद्या जेथें आहेत पुष्करादि सरोवरें, उत्तम लोकांनीं आश्रय केलेलीं क्षेत्रें, तसेंच कुरुक्षेत्र, गया, प्रयाग, पुलहाश्रम, नैमिषारण्य, फल्गुतीर्थ, सेतु, प्रभास, द्वारका, वाराणसी, मथुरा, पंपासरोवर, बिंदुसरोवर, बदरिकाश्रम, नंदा, सीता व राम ह्यांचे आश्रम वगैरे, महेंद्र व मलय इत्यादि सर्वकुलपर्वत आणि जेथें श्रीहरीच्या मूर्ति आहेत ते देश हीं पुण्यकारक स्थानें होत. कल्याणेच्छु पुरुषानें वारंवार ह्या स्थानांचें सेवन करावें. कारण ह्या ठिकाणीं केलेला धर्म सहस्रपटींनीं अधिक फळ देणारा होतो ॥ २९ ॥ ३० ॥ ॥ ३१ ॥ ३२ ॥ ॥ ३३ ॥ हे भूपते, श्रेष्ठ व सत्पात्र याची व्यवस्था करतांना विद्वान् लोकांनीं एक फक्त श्रीहरीच श्रेष्ठ होय असें सांगितलें आहे. कारण हें संपूर्ण चराचर विश्व श्रीहरिमय आहे ॥ ३४ ॥ ह्याविषयीं प्रत्यक्ष अनुभव असा पाहा कीं, देव, ऋषि, सिद्ध आणि सनकादि ब्रह्मपुत्र आदिकरून विद्यमान असतांहि तुझ्या राजसूययज्ञामध्यें अग्रपूजेसाठीं भगवान् श्रीकृष्णच सत्पात्र म्हणून मान्य झाला. ॥ ३५ ॥ कारण जीवसमुदायांनीं व्याप्त असलेला ब्रह्मांडकोशरूप जो वृक्ष त्याचें मूळकारण अच्युतच आहे. अर्थात् त्याची पूजा केली असतां सर्व जीवांची व आत्म्यांची तृप्ती केल्यासारखें होतें ॥ ३६ ॥ हे राजा, नर, पशु, पक्षी, ऋषि देवताव हीं पुरें(शरीरें)सर्व त्या परमेश्वरानेंच उत्पन्न केलीं आहेत व ह्या सर्वपुरांमध्यें अंतर्यामिरूपानें आणि प्रत्यंगशानें तो स्वत: वास करितो, म्हणून पुरुष ह्या नांवानें तो प्रसिद्ध आहे ॥ ३७ ॥ ह्या मनुष्यादिक शरिरामध्यें भगवान् तारतम्यानें म्हणजे पशुपक्ष्यादि शरिरांपेक्षा पुरुषशरिरांत अधिक अंशांनीं असा राहतो, ह्यामुळें पुरुष हाच सत्पात्र होय त्यांतूनहि ज्या ज्या ठिकाणीं तपश्चर्यादिकांच्या योगानें ज्ञानांश अधिक अनुभवास येतो, त्याच्या ठिकाणीं तो पुरुष अधिक सत्पात्र आहे असें समजावें ॥३८॥ हे राजा, त्रेतादियुगामध्यें मनुष्यादि कांना एकामेकांचा अपमान करण्याची बुद्धि उत्पन्न झाली असें पाहून, विद्वान् लोकांनी पूजेकरितां श्रीहरीची प्रतिमा कल्पिली ॥ ३९ ॥ तेव्हांपासून कांहीं लोकांनीं प्रतिमेवरच चांगली श्रद्धा ठेवून चांगल्या प्रकारच्या पूजासामग्रीनें श्रीहरीची उपासना सुरू केली; तथापि पुरुषद्वेषी लोकांनीं प्रतिमेची पूजा केली असतांहि त्यांना ती पुरुषार्थ देणारी होत नाहीं; पण पुरुषांविषयीं द्वेषभाव सोडून तिचें अर्चन केलें असतां मंदाधिकारी पुरुषांनाहि ती

पुरुषार्थ देणारी होते ॥ ४० ॥ हे राजेंद्रा, पुरुषांमध्येंहि जो तप, विद्या आणि संतोष ह्यांच्या योगानें श्रीहरीची वेदरूप तनु धारण करितो, तो ब्राह्मणच सत्पात्र आहे, असें तत्त्ववेत्ते म्हणतात ॥ ४१ ॥ कारण, हे राजा, आपल्या चरणरजानें त्रैलोक्य पवित्र करणारे ब्राह्मण खरोखर ह्या जगदात्म्या श्रीकृष्णाचेंहि मोठें दैवत होत ॥ ४२ ॥

**चौदावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १५ वा

नारद म्हणाला,—हे धर्मराजा, कित्येक ब्राह्मण कर्मनिष्ठ असतात व कित्येक तपोनिष्ठ असतात. तसेंच कांहीं वेदाध्ययनाविषयीं तत्पर, तर कांहीं अध्यापनाविषयीं तत्पर असतात आणि कांहीं ज्ञानाभ्यासाविषयीं तत्पर असून कांहीं योगाभ्यासाविषयीं तत्पर असतात ॥ १ ॥ मोक्षरूप फळ प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें पितरांना उद्देशून द्यावयाचें कव्य अन्न आणि देवांना द्यावयाचें हव्य अन्न हीं दोन्ही त्यांपैकीं ज्ञाननिष्ठ ब्राह्मणाला द्यावीं; पण तसा ब्राह्मण न मिळाला तर इतरांस योग्यतेप्रमाणें द्यावीं ॥ २ ॥ श्राद्धप्रसंगीं देवस्थानीं दोन ब्राह्मण आणि पितृस्थानीं तीन ब्राह्मण अथवा दोहों ठिकाणींहि एकेक ब्राह्मण बसवून त्यांस भोजन घालावें. यजमान जरी समर्थ असला तथापि त्यानें श्राद्धप्रसंगीं अधिक ब्राह्मण सांगूं नयेत ॥३॥ तसेंच कारणाव्यतिरिक्त आप्तेष्टांनाहि निमंत्रण करून पसारा वाढवूं नये; कारण तसें केल्यानें देश, काल, तदनुकूल श्राद्धान्नादि द्रव्य-पात्र आणि पूजनसाहित्य हीं योग्य रीतीनें पुरवठ्यास येत नाहींत ॥ ४ ॥ योग्य ठिकाण आणि योग्य काळ प्राप्त झाले असतां मुनींना सेवन करण्यास योग्य असें अन्न श्रीहरीला समर्पण करून श्रद्धापूर्वक यथाविधि सत्पात्र ब्राह्मणांना अर्पण करावें, म्हणजे तें सर्व मनोरथ पूर्ण करणारें आणि मोक्षप्रद होतें ॥ ५ ॥ देव, ऋषि, पितर, भूतें, स्वतः आपण आणि इष्टमित्र ह्यांना उत्तम प्रकारें तयार केलेलें अन्न वांटून द्यावें व ते सर्व देवादिक ईश्वररूपी आहेत असें समजावें ॥ ६ ॥ धर्मतत्त्व जाणणाऱ्या पुरुषानें श्राद्धामध्यें मांस अर्पण करूं नये व आपणहि भक्षण करूं नये. कारण मुनींनीं सेवन करण्यास योग्य अशा तांदूळआदि करून अन्नांनीं जशी पितरांची सर्वोत्कृष्ट तृप्ति होते तशी पशुहिंसेनें होत नाहीं ॥ ७ ॥ सद्धर्मेच्छु पुरुषांनीं भूत हिंसेचा कायावाचामनेंकरून त्याग करणें याच्यासारखा दुसरा कोण-ताहि उत्कृष्ट धर्म नाहीं ॥ ८ ॥ म्हणूनच यज्ञवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असे कित्येक ज्ञानी पुरुष, आत्मज्ञानानें प्रदीप्त झालेल्या मनोनिग्रहरूप अग्नीमध्यें कर्ममय यज्ञांचें हवन करितात, म्हणजे मनोनिग्रह करून त्याला विघ्नकारक होत असलेल्या बाह्यकर्मांचा त्याग करितात ॥ ९ ॥ कारण, पशुपुरोडाश इत्यादि द्रव्यांनीं यज्ञ करणाऱ्या पुरुषाला पाहून, हा आत्म-तत्त्व न जाणणारा व आपल्या प्राणांची मात्र तृप्ति करणारा निर्दय पुरुष आहे असें मानून सर्व प्राणी त्यास भीत असतात ॥ १० ॥ यास्तव दैवानें प्राप्त झालेल्या सात्त्विक अन्नानें धर्मवेत्त्या पुरुषानें प्रतिदिवशीं संतोषपूर्वक नित्यनैमित्तिक कर्में करावीं आणि विधर्म, परधर्म, आभास, उपमा आणि छल हे अधर्माचे पांच प्रकार धर्मवेत्त्या पुरुषानें अधर्माप्रमाणेंच वर्ज्य करावे ॥ ११ ॥ १२ ॥ ज्यांचें अनुष्ठान केलें असतां स्वधर्माला बाध येतो तो विधर्म होय. दुसऱ्यासाठीं सांगितलेला धर्म तो परधर्म होय. वेदविरुद्ध ग्रंथामध्यें सांगित-लेला जो पाखंडधर्म अथवा भोंदूधर्म तो उपधर्म असून धर्मवचनांचा भलताच अर्थ करून

तोच धर्म होय असें म्हणणें हा छल होय. तसेंच चारहि आश्रमांहून निराळा असा अवधूतादिकांचा जो आचार, तो स्वधर्म समजून मनुष्यांनीं त्याचा स्वीकार करूं नये. तो आभास होय. अधर्म सोडून ब्राह्मणादिकांना स्वभावानुसार सांगितलेला जो वेदाध्ययनादिक धर्म तोच सर्वांस शांति देण्यास समर्थ आहे ॥ १३ ॥ १४ ॥ असो. याप्रमाणें धनहीन पुरुषानें धर्मासाठीं अथवा देहधारणेसाठीं द्रव्याची इच्छा करूं नये. कारण, कांहींएक खटपट न करणाऱ्या पुरुषाला अजगराप्रमाणें त्याचा निरिच्छपणाच चरितार्थाचें साधन पुरवितो ॥१५॥ संतुष्ट, निरिच्छ व स्वस्वरूपीं रममाण होणाऱ्या पुरुषाला जें सुख मिळतें तें विषयलोभामुळें द्रव्यप्राप्तीसाठीं दशदिशा भटकणाऱ्या पुरुषाला मिळत नाहीं. ॥ १६ ॥ पायांमध्यें जोडा असलेल्या पुरुषाला जसे खडे, कांटे इत्यादिकांपासून दुःख होत नाहीं, त्याप्रमाणें सर्वदा संतुष्टचित्त असलेल्या पुरुषाला सर्व दिशा सुखमय होतात ॥ १७ ॥ हे राजा, केवळ उदकावरहि लोकांनीं संतुष्ट कां राहावें हें मला समजत नाहीं. कारण उपस्थेंद्रिय व रसनेंद्रिय यांपासून मिळणाऱ्या सुखावर लंपट झाल्यामुळें मनुष्याला कुत्र्याप्रमाणें आचरण करावें लागतें ॥ १८ ॥ जो ब्राह्मण असंतुष्ट असतो त्याला वेदाध्ययनादिकांपासून प्राप्त झालेलें. तेज, विद्या, शास्त्रापासून झालेलें ज्ञान, तप, व्रतोपवासादिकांपासून मिळालेलें पुण्य व सत्कीर्ति हीं सर्व इंद्रियांच्या विषयासक्तीमुळें क्षीण होत जातात आणि त्यांचा सारासार विवेकहि नष्ट होतो ॥ १९ ॥ हे राजा, अन्न व जल यांची प्राप्ती म्हणजे क्षुधा व तृषा ह्यांची शांति होते, तसेंच हिंसादिकांची प्राप्ति झाली नाहीं म्हणजे क्रोधाची शांति होते. दशदिशा जिंकून सर्व पृथ्वीचा उपभोग मिळाला तरीसुद्धां लोभाची शांति होत नाहीं ॥ २० ॥ हे राजा, लौकिकन्याय जाणणारे, दुसऱ्यांच्या संशयांची निवृत्ति करणारे, सभांचे अधिपति असे पुष्कळ पंडित देखील असंतोषामुळें नरकांत पडतात ॥ २१ ॥ यास्तव संकल्पाचा त्याग करून वासनेवर जय मिळवावा, कामना वर्ज्य करून क्रोध जिंकावा, हे विषय अनर्थकारक आहेत असें समजून घेऊन लोभ जिंकावा आणि तत्त्वविचारानें संसारभयाची निवृत्ति करावी ॥ २२ ॥ तसेंच आत्मानात्मविवेकानें शोक व मोह यांचा त्याग करावा. मौन धारण करून लोकवार्तादिक योगविघ्नें टाळावीं आणि देहादिकांची हालचाल बंद करून हिंसेचा त्याग करावा ॥ २३ ॥ ज्या प्राण्यांपासून आपल्याला भय उत्पन्न होतें, त्यांचें हित करून त्यांच्यापासून झालेलें भय नाहींसें करावें, दैवानें प्राप्त झालेलें दुःख मनाच्या समाधानानें निवृत्त करावें, प्राणायामादि योगाच्या बलानें देहजन्य दुःख घालवावें आणि सात्त्विक अहंकारादिकांचें सेवन करून निद्रेचा त्याग करावा ॥ २४ ॥ तसेंच सत्त्वगुण वृद्धिंगत करून रजोगुण व तमोगुण जिंकावा व मनोनिग्रहानें सत्त्वगुणाला जिंकावें; पण गुरूच्या ठिकाणीं भक्ति करण्यानें पुरुषाला कामादि सर्वांना अनायासानेंच जिंकतां येतें ॥ २५ ॥ हे राजा, साक्षात् ज्ञानदीप देणाऱ्या अशा भगवान् गुरूविषयीं हा मनुष्य आहे अशी दुर्बुद्धि जो ठेवील त्याचें सारें अध्ययन हत्तीच्या स्नानविधिप्रमाणें व्यर्थ होय ॥ २६ ॥ हे राजा, गुरु म्हणजे प्रकृतिपुरुषांचा नियंता व योगेश्वरांनींहि ज्याच्या चरणकमळांचें ध्यान करावें असा जो साक्षात् भगवान् तोच होय; पण

केवळ भ्रमामुळें लोक त्याला मनुष्य असें मानितात ॥ २७ ॥ हे राजा, सहा विकारांच्या गणांचें संयमन करणें हाच साऱ्या धर्मनियमांचा उद्देश होय. असा उद्देश असल्यामुळें धर्मनियमांच्या योगानें जर योगसिद्धि न होईल तर ते सारे केवळ श्रमालाच कारण होतील ॥ २८ ॥ जशीं शेतकी आदि कर्में व त्यांचीं फळें मोक्षाला साधन न होतां उलट संसारालाच कारण होतात, त्याप्रमाणें बहिर्मुख असलेल्या लोकांचीं इष्टापूर्तादि कर्में परमार्थाला साधन होत नाहींत ॥ २९ ॥ हे राजा, जो पुरुष चित्ताचें संयमन करण्याविषयीं उद्युक्त असेल त्यानें कोणत्याहि वस्तूचा संग्रह न करितां, सर्वसंगपरित्याग करून संन्यास ग्रहण करावा आणि भिक्षेनें प्राप्त झालेलें परिमित अन्न भक्षण करून एकांतस्थळाचा आश्रय करून राहावें ॥ ३० ॥ योगसाधन करणारांनीं, एकांतीं शुद्ध व सपाट प्रदेशीं स्थिर व सारखें असें आसन घालून त्याच्यावर बसावें व शरीर सरळ ठेवून मुखानें प्रणवोच्चार करीत राहावें ॥ ३१ ॥ आणि नासाग्रावर दृष्टि ठेवून मन विषयपराङ्मुख होईपर्यंत पूरक, कुंभक आणि रेचक ह्यांच्यायोगानें प्राणवायु व अपानवायु ह्यांचा उत्तम प्रकारें निरोध करावा ॥ ३२ ॥ विषयांच्या आकर्षणानें भ्रमण करीत असलेलें मन सैरावैरा धांवत असतें. तेथून तें माघारें वळवून ज्ञानी पुरुषानें त्याला हळूहळू हृदयामध्यें स्थापन करावें ॥ ३३ ॥ त्याप्रमाणें सारखा अभ्यास करीत राहिल्यास काष्ठरहित झालेला अग्नि जसा थोड्या वेळानें विझून जातो, तसें त्या योग्याचें चित्त थोड्याच काळामध्यें शांति पावतें ॥ ३४ ॥ विषयांनीं क्षुब्ध केलेलें, ज्याच्या सर्व वृत्ति शांत झाल्या आहेत व जें ब्रह्मसुखाला पावलें आहे असें चित्त पुनः कधींहि विषयांकडे वळत नाहीं ॥ ३५ ॥ हे धर्मराजा, धर्म, अर्थ आणि काम ह्या तिन्ही पुरुषार्थांचें उत्पत्तिक्षेत्र असा हा गृहस्थाश्रम आहे. याचा एकदां त्याग करून संन्यास ग्रहण केल्यावर जो भिक्षु त्या गृहस्थधर्माचें पुन्हा सेवन करितो, तो ओकलेलें अन्न भक्षण करणारा व निर्लज्ज होय असें समजावें ॥ ३६ ॥ जे महामूर्ख असतात त्यांना आपला देह आत्मा नव्हे, तो मरणधर्मी आहे व मरणानंतर तो विष्ठारूप, कृमिरूप आणि भस्मरूप होतो, असें एकदां समजलें असतांहि पुनः ते ह्या देहाला शाश्वत समजतात, व त्याची प्रशंसा करूं लागतात ॥ ३७ ॥ हे राजा, गृहस्थाचा कर्मत्याग, ब्रह्मचाऱ्याचा व्रतत्याग, तपस्व्याचें गांवांत येऊन राहाणें आणि संन्याशाची विषयासक्ति हीं आश्रमधर्मांच्या दृष्टीनें अत्यंत नीच कर्में होत; कारण त्यामुळें खरोखर आश्रमाची विटंबना होते. असे करणारे पुरुष देवाच्या मायेनें मोहित झाले आहेत असें समजून उपेक्षापूर्वक त्यांची कींवच करावी ॥ ३८ ॥ ३९ ॥ ज्ञानाच्या योगानें ज्याच्या वासना नष्ट झाल्या आहेत असा ज्ञानी पुरुष, परमात्म्याचें ज्ञान करून घेईल, तर तो केव्हांहि व कोणत्याहि सुखाची इच्छा धरून अथवा कोणत्याहि हेतूनें विषयासक्त होऊन देहाचें पोषण करणार नाहीं ॥ ४० ॥ हे राजा, देह हा एक रथ आहे आणि इंद्रियें हीं त्याचे अश्व असून इंद्रियाधिपति मन हाच त्यांना आवरून धरावयाचा लगाम आहे आणि शब्दादि विषय हे मार्ग असून निश्चयात्मक बुद्धि हा सारथी आहे आणि ईश्वरानें निर्माण केलेलें चित हेंच जोखड

आहे असें तत्त्ववेत्ते म्हणतात ॥ ४१ ॥ त्याचप्रमाणें दहा प्रकारचा प्राण हा त्या रथाचा कणा असून पाप व पुण्य हीं दोन चाकें आहेत. या रथावर अभिमानी जीव हा रथी असून, प्रणव हें त्याचें धनुष्य आहे आणि शुद्ध जीव हा बाण असून परब्रह्म हेंच त्याचें लक्ष्य आहे असें म्हणतात ॥ ४२ ॥ राग, द्वेष, लोभ, शोक, मोह, भय, मद, मान, अवमान, असूया, वंचना, हिंसा, मत्सर, आग्रह, प्रमाद, क्षुद्रा व निद्रा इत्यादि हे शत्रु होत. कांहीं रजोगुणी कांहीं तमोगुणी वृत्ति, तशाच परोपकारादि कित्येक सात्त्विक वृत्तिहि शत्रु होतात ॥ ४३ ॥ ४४ ॥ म्हणून इंद्रियादि सर्व सामुग्रीनें युक्त असा हा देहरूपी रथ जोंपर्यंत मनुष्यानें धारण केला आहे, तोंपर्यंत त्यानें गुरुचरणांची सेवा करून तीक्ष्ण केलेलें ज्ञानखड्ग धारण करावें व भगवान् अच्युताचा आश्रय करून शत्रूंचें निरसन करावें आणि मग चित्तामध्यें शांति धारण करून आत्मानंदानें संतुष्ट व्हावें व ह्या देहादिकांची उपेक्षा करावी ॥ ४५ ॥ कारण अच्युताचा आश्रय नसेल तर अत्यंत गैरसावध असलेल्या ह्या रथाधिपति जीवाला, बहिर्मुख जे इंद्रियरूप घोडे व बुद्धिरूप सारथि हीं प्रवृत्तिरूप आड-मार्गांत नेऊन विषयरूप डोहामध्यें टाकितात आणि नंतर ते चोर, अश्व व सारथि ह्यांच्या-सह ह्या रथ्याला महामृत्युभयानें युक्त व अंधकारानें व्याप्त अशा संसाररूप कूपामध्यें नेऊन टाकितात ॥ ४६ ॥ हे धर्मराजा, प्रवृत्त व निवृत्त असें दोन प्रकारचें वैदिक कर्म आहे, त्यांपैकीं प्रवृत्तकर्माच्या योगानें पुरुष वारंवार संसारामध्यें पडतो व निवृत्तकर्माच्या योगानें मोक्ष पावतो ॥ ४७ ॥ हे राजा, पश्वादिहिंसायुक्त व व्रीह्यादि द्रव्यमय अशीं जीं अग्नि-होत्रादि कर्में म्हणजे अग्निहोत्र, सोमयाग, वैश्वदेव व बलिहरण इत्यादि, यांना इष्ट असें म्हणतात आणि देवालयें, विश्रांतिस्थानें, विहिरी बांधणें, पाणपोया, अन्नसत्रें, इत्यादि स्थापन करणें याला पूर्त असें म्हणतात. हीं दोन्हीं प्रकारचीं कर्में प्रवृत्ति मार्गांतील होत ॥ ४८ ॥ ४९ ॥ हे राजा, प्रवृत्त कर्म करणारा पुरुष, प्रथमतः चरुपुरोडशादि द्रव्यांचें जें देहोत्पादक रूप तें पावून तो धूमाभिमानिनी देवता, राज्यभिमानिनी देवता, कृष्णपक्षा-भिमानिनी देवता, दक्षिणायनाभिमानिनी देवता, आणि चंद्रलोक यांना पावतो. नंतर त्या चंद्रलोकामध्यें भोगांचा उपभोग घेतल्यानंतर तो अदृश्य होऊन वृष्टिद्वारा औषधि, लता, अन्न आणि रेत ह्यांच्या रूपानें अनुक्रमानें तेथून खालीं येतो. ह्याप्रमाणें हा प्रवृत्तकर्ममार्ग पुनर्ज-न्माला कारण आहे. सारांश, प्रवृत्तकर्म करणारा पुरुष क्रमानें प्रत्येक अवस्था पावून पुनः मृत्युलोकीं जन्मास येतो ॥ ५० ॥ ५१ ॥ हे राजा, गर्भाधानापासून तों अंत्येष्टीपर्यंतच्या संस्कारांनीं संस्कृत झालेला द्विज ह्या मार्गाविषयीं अधिकारी होय; परंतु निवृत्तकर्मनिष्ठ पुरुष, ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणीं कर्मेंद्रियांच्या व्यापारांची ऐक्यभावना करितात, म्हणजे दर्शनादि संकल्परूप मनाच्या ठिकाणीं इंद्रियांची, वाणीच्या ठिकाणीं विकारयुक्त मनाची, वर्णसमुदायांत वाणीची, अकारादि स्वरत्रयात्मक ॐ कारामध्यें वर्णसमुदायाची, बिंदूच्या ठिकाणीं ॐकाराची, नादाच्या ठिकाणीं बिंदूची, सूत्रात्मकरूप प्राणांत नादाची आणि ब्रह्मामध्यें त्या प्राणाची याप्रमाणें ऐक्यभावना करितात ॥ ५२ ॥ ५३ ॥ हे राजा, निवृत्त-कर्मनिष्ठ ज्ञानी पुरुष अनुक्रमानें अग्नि, सूर्य, दिवस, सायंकाळ, शुक्लपक्ष, पौर्णिमा आणि

स्थूलोपाधि असतो. या अवस्थेंत भोग भोगल्यानंतर सूक्ष्माच्या ठिकाणीं स्थूलोपाधीचा तो लय करतो आणि तैजसनामक सूक्ष्मोपाधिरूप होतो. नंतर सूक्ष्मोपाधीचाहि कारणामध्यें लय करून तो प्राज्ञनामक कारणोपाधि होतो. तें कारण साक्षीरूपानें अवस्थात्रयामध्यें व्यापून राहिल्यामुळें त्याचा साक्षिस्वरूपामध्यें लय करून तो ह्या तीन अवस्थांच्या पलीकडील तुरिया अवस्थेंत जातो व शुद्ध आत्मस्वरूप होऊन मुक्त होतो ॥५४ ॥ असो. हे राजा, या मार्गाला देवयान, म्हणजे निवृत्तकर्ममार्ग असें म्हणतात. ज्याचें अंतःकरण अगदीं शांत झालें आहे असा आत्मोपासक पुरुष ह्या मार्गानें गेला असतां अनुक्रमानें अग्न्यादिकांच्या अभिमानी देवतांचें रूप पावून शेवटीं आत्मनिष्ठ होतो. प्रवृत्तकर्मनिष्ठ पुरुषाप्रमाणें तो पुनः संसारामध्यें परत येत नाहीं ॥ ५५ ॥ जो पुरुष हे वेदप्रतिपादित प्रवृत्तनिवृत्तकर्ममार्ग शास्त्रदृष्टया जाणतो, तो देहस्थ असूनहि मोह पावत नाहीं ॥ ५६ ॥ कारण देहाच्या आरंभीं कारणरूपानें व अंतीं अवधिरूपानें जें असतें, तसेंच बाह्यगत, भोक्तृरूपानें अंतर्गत, उच्च, नीच, ज्ञान, ज्ञेय, वचन, वाच्य, तम आणि प्रकाश, असें जें कांहीं आहे तें सर्व हा ज्ञानी पुरुष स्वतःच होतो ॥ ५७ ॥ हे राजा, तर्काला विरोध येत असल्यामुळें सर्व प्रकारें खोटा म्हणून ठरलेला प्रतिबिंबादिक आभास जसा सत्य म्हणून प्रतीत होत असला तरी तो खरा नाहीं; तसाच हा सर्व इंद्रियांनीं उपभोग घेण्याचा विषयसमुदायादि प्रकार खरा म्हणून भासत असला तरी तो खरा नसून कल्पित आहे. त्याला वास्तविक अस्तित्व नाहीं; कारण तसें होणें दुर्घट आहे ॥ ५८ ॥ हे राजा, पृथिव्यादि पंचमहाभूतांच्या ऐक्यबुद्धीला आश्रयरूप जे देहादिक प्रकार ते पंचमहाभूतांचा समुदाय, विकार व परिणाम ह्यांतील कांहींच नाहीं. तसेंच सर्वांत, विकार, पृथक्पणा व एकत्व हीं त्या ठिकाणीं संभवत नसल्यामुळें हे देहादिक सर्व प्रकार मिथ्याच होत ॥५९ ॥ देहादिकास धारण करणारीं पंचमहाभूतें सावयव आहेत; परंतु स्वकीय सूक्ष्म अवयवांवाचून तीं कधींहि असावयाचीं नाहींत. कारण अवयव सत्य आहे असें म्हणावें, तर पूर्वोक्त प्रकारानें अवयवी पदार्थ असत्य ठरतो; अर्थात् त्याचा अवयवहि शेवटीं असत्यच ठरतो. ॥६०॥ हे राजा, परमात्म्याच्या ठिकाणीं अज्ञानानें भेद कल्पित असल्यामुळें व पूर्वपूर्वावस्थेंतील आरोपाचें उत्तरोत्तर अवस्थांमध्यें सादृश्य असल्यामुळें तोच हा देवदत्त असें वाटतें; पण ही केवळ भ्रांति आहे. ही भ्रांति अज्ञाननिवृत्तीपर्यंतच असते. स्वप्नामध्यें जाग्रत व सुषुप्ति ह्या अवस्थांना जसा मिथ्या अनुभव येतो, तशीच विधिनिषेधांची व्यवस्था होय ॥ ६१ ॥ हे राजा, भावाद्वैत, क्रियाद्वैत व द्रव्याद्वैत हीं जाणणारा मुनि ह्या दोहोंच्या ठिकाणीं असतांनाच आत्मतत्त्वानुभवानें आपल्या जाग्रदादि तिन्ही अवस्थांची निवृत्ति करितो. पट आणि तंतू ह्यांमध्यें जसा तंतूंचा पट आहे, त्याप्रमाणें सर्व ठिकाणीं कार्यकारणरूप वस्तु एकच आहे, असें जें म्हणणें त्याला भावाद्वैत म्हणतात. कारण भेदाला वास्तविक अस्तित्व नाहीं ॥ ६२ ॥ ॥ ६३ ॥ तसेंच हे कुंतिपुत्रा धर्मराजा, कायावाचामनेंकरून केलेलें सर्व कर्म फलेच्छा सोडून परब्रह्माला अर्पण करणें ह्याला क्रियाद्वैत म्हणतात ॥ ६४ ॥ आपण स्वतः, उत्तरायण ह्यांच्या अभिमानी देवतांना पावून, शेवटीं ब्रह्मलोकाला जातो. तेथें तो प्रथमतः

भार्या, पुत्र आणि इतरहि सर्व प्राणी यांच्याशीं वित्तादिकांचें व भोगांचें ऐक्य मानणें, म्हणजे सर्वांचे देह पंचमहाभूतात्मक असून सर्वांचा भोक्ता एक परमात्माच आहे, अशा अभेददृष्टीनें अर्थ व काम ह्या उभयतांना ऐक्यदृष्टीनें पाहाणें, त्याला द्रव्याद्वैत म्हणतात ॥ ६५ ॥ ज्या देशकालामध्यें, ज्या उपायानें, ज्यापासून जें द्रव्य ज्या पुरुषाला विहित असेल त्याच द्रव्यानें त्या पुरुषानें तीं विहित कर्में करावीं. आपत्काल नसतांना इतर द्रव्यांनीं करूं नयेत ॥ ६६ ॥ असो, हे राजा, अशाप्रकारें वेदोक्त स्वकर्माच्या योगानें ह्या श्रीकृष्णाची भक्ति करणारा पुरुष, गृहस्थाश्रमी असतांनाहि ह्याच्या स्वरूपाला पावतो ॥ ६७ ॥ हे राजाधिराजा, परिहार करण्यास अशक्य अशा अनेक विपत्ती परमात्म्या श्रीकृष्ण प्रभूच्या साहाय्यानें जसा तूं तरून गेला आहेस, व त्याच्याच चरणकमलाच्या सेवेमुळें दिग्गजापर्यंतचा देश जिंकून जसे तूं राजसूयादिक यज्ञ केले आहेस त्याप्रमाणें त्या श्रीकृष्णाच्याच आश्रयानें तूं या संसारांतूनहि तरून जा ॥ ६८ ॥ हे राजा, पूर्वीं गेलेल्या महाकल्पामध्यें गंधर्वांमध्यें श्रेष्ठ असा उपबर्हण नांवाचा मी एक गंधर्व होतों. सौंदर्य, सौकुमार्य, वाङ्माधुर्य आणि सौगन्ध्य ह्यांच्या योगानें सर्वांस प्रिय वाटत असे. स्त्रियांनाहि मी अत्यंत प्रिय असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं लंपट होऊन मी अत्यंत उन्मत्त झालों होतों ॥ ६९ ॥ ७० ॥ एके दिवशीं देवांच्या सत्रामध्यें दक्षप्रभृति प्रजापतींनीं श्रीहरीचें यशोगायन करण्याकरितां गंधर्वसमुदाय व अप्सरा ह्यांस बोलाविलें असतां, स्त्रियांबरोबर गायन करीत करीतच मी त्या ठिकाणीं गेलों. त्यावेळीं मीं शिस्तीची अवज्ञा केली असें जाणून प्रजापतींनीं क्रोधाच्या आवेशांत,—'ज्या अर्थीं तूं आमची अवज्ञा केलीस त्या अर्थीं तूं निस्तेज होऊन सत्वर शूद्रयोनींत जन्म घे, '—असा मला शाप दिला ॥ ७१ ॥ ७२ ॥ तो शाप होतांक्षणींच मी एका दासीच्या उदरीं जन्मास आलों; परंतु त्या शूद्रजन्मामध्येंहि मला ब्रह्मवेत्त्यांचा समागम व त्यांची शुश्रूषा घडल्यामुळें पुढें मी ब्रह्मदेवाचा पुत्र झालों ॥ ७३ ॥ असो, हे धर्मराजा, ज्याच्या योगानें गृहस्थाश्रमी पुरुषांनाहि अनायासानें संन्याशांना मिळणारी गति मिळते तो हा गृहास्थाश्रमांतील पापनिवर्तक धर्म मीं तुला सांगितला आहे ॥ ७४ ॥ हे धर्मराजा, मनुष्यलोकामध्यें तुम्ही खरोखर भाग्यशील आहां; कारण तुमच्या घरीं मनुष्यरूप धारण करून साक्षात् श्रीकृष्ण परब्रह्म गुप्तपणें वास करीत आहे आणि दर्शनमात्रेंकरूनच सर्व लोकांस पवित्र करणारे असे जे मुनि ते सर्व दिशांकडून तुम्हांकडे येत असतात ॥ ७५ ॥ हे धर्मराजा, महाविवेकी लोकांना इच्छा करण्यास योग्य असा जो उपाधिरहित परमानंदाचा अनुभव घेणारा व तद्रूप जें ब्रह्म, तेंच हा खरोखर तुमचा प्रिय, सुहृत्, मातुलपुत्र आत्मा, आज्ञाधारक, गुरु, व तुम्हांला पूज्य असा श्रीकृष्ण होय ॥ ७६ ॥ हे राजा, साक्षात् शंकर ब्रह्मदेव इत्यादिकांनाहि आपल्या बुद्धीच्या योगानें ज्याचें वास्तविक यथार्थ तत्त्व वर्णन करितां आलें नाहीं, तो भक्तपालक भगवान्, मौन, भक्ति आणि इंद्रियदमन यांच्या योगानें आम्हीं पूजिला आहे; तो आम्हांवर प्रसन्न होवो ॥ ७७ ॥

शुकाचार्य म्हणाले, –हे धर्मराजा, ह्याप्रमाणें देवर्षि नारदानें कथन केलेलें धर्म-रहस्य भरतकुलामध्यें श्रेष्ठ अशा धर्मराजानें श्रवण केल्यावर, तो प्रेमानें अगदीं गहिंवरून गेला व अत्यंत प्रसन्न चित्तानें त्यानें नारदमुनींचें पूजन केलें ।। ७८ ।। नंतर तो नारदमुनि, श्रीकृष्ण व कुंतीपुत्र युधिष्ठिर ह्यांचा निरोप घेऊन तेथून गेला. कृष्ण हा साक्षात् परब्रह्म आहे असें नारदमुखानें वर्णन श्रवण करून धर्मराजा अतिशय विस्मित झाला ।। ७९ ।।

शुकाचार्य म्हणाले, –हे परीक्षित्‌राजा, ह्याप्रमाणें ज्यामध्यें देव, असुर, व मानव इत्यादिचराचर प्राणी उत्पन्न झाले आहेत, ते हे दक्षकन्यांचे निरनिराळे वंश मीं तुला सांगितले ।। ८० ।।

**पंधरावा अध्याय समाप्त**

## सातवा स्कंध समाप्त

---